


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन'**

**विद्वत्प्रमाणित नियतकालिक**

**आर.एन.आय. ४००४८/८ ISSN 2231-4059**

**संपादक मंडळ : संपादक :** प्र. ना. परांजपे

**कार्यकारी संपादक :** विजय पाध्ये

**संपादन समिती :** आनन्द काटीकर, विजया चौधरी, सरोजा भाटे, सलील वाघ

**प्रकाशक, मुद्रक, संपादकीय व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठवण्यासाठी पत्ता -**

आनन्द काटीकर, बी-५/१६, सनसिटी,
सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे -४११०५१
संपर्क : ९४२१६ १०७०४
**marathi.abhyas.parishad@gmail.com**

**मुद्रणस्थळ :** एकवीरा पब्लिसिटी,
गट क्र. १/२७+२९, माऊली सह. गृहरचना,
कर्वेनगर, पुणे – ५२

**वर्गणीचे दर**

| | वार्षिक | त्रैवार्षिक | पंचवार्षिक |
|---|---|---|---|
| व्यक्ती | १५० | ४०० | ७०० |
| संस्था | २०० | ५५० | ९०० |

**आजीव सभासदत्व- व्यक्तींसाठी** रु. २,१००/-

या अंकाची किंमत - रु. २०/-

**: जाहिरात दर :**

| पूर्ण पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|
| २,५००/- | १,५००/- | ८००/- |

**प्रकाशन : त्रैमासिक :**

जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)

**- थेट बँकेत वर्गणी भरण्याची सूचना -**

खातेधारक नाव : मराठी अभ्यास परिषद
खाते क्रमांक : २००५ ७१६ ४२६०
बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र
शाखा : टिळक रस्ता, पुणे
**IFSC : MAHB0000041**
बँकेत वर्गणीचे पैसे भरल्यावर कृपया ९९२३६ ७१८२० किंवा ९४२१६ १०७०४ या क्रमांकावर संदेश पाठवावा अथवा पत्र किंवा इ-पत्र पाठवावे.

**सूचना :**

१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असेलच, असे नाही.

२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांच्याकडून अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ आणि राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.











मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन

वर्ष ३४, अंक १ : हिवाळा २०१६

## अनुक्रमणिका



### विशेष निवेदन

गेले वर्षभर काही व्यवस्थापकीय अडचणींमुळे, मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन' चे अंक नियमितपणे निघू शकले नाहीत. याबद्दल क्षमस्व!

आगामी काळात आम्ही हे सारे अंक (कदाचित नेहमीपेक्षा कमी पानांचे) लागोपाठ प्रकाशित करण्याचा प्रयत्न करत आहोत. समृद्ध परंपरा असणाऱ्या आपल्या नियतकालिकाच्या नियमिततेत खंड पडणे योग्य नाही, याची आम्हाला जाणीव आहे. २०१७ ह्या वर्षाच्या अखेरपर्यंत नियमानुसार सर्व अंक प्रकाशित होतील, असे प्रयत्न आम्ही करत आहोत. 'भाषा आणि जीवन'वरील आपला लोभ कायम ठेवावा, ही सर्व वाचक, अभ्यासक आणि वर्गणीदार यांना विनंती.

आनन्द काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद





अनुक्रमणिका

## लेखक परिचय


- आनन्द काटीकर, साहाय्यक प्राध्यापक, मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे; चलभाष : ९४२१६ १०७०४
- प्रदीप गोपाळ देशपांडे , सेवानिवृत्त प्राध्यापक, इंग्रजी विभाग, सरस्वती भुवन महाविद्यालय, औरंगाबाद
- योगिता आशुतोष पाटील, साहाय्यक प्राध्यापक, मराठी विभाग, झुलाल पाटील महाविद्यालय, धुळे
- विवेक भट, रासायनिक अभियंता आणि भाषावैज्ञानिक, मुंबई विश्वविद्यालय आणि अन्य काही शैक्षणिक संस्थांमध्ये अभ्यागत प्राध्यापक
- आबासाहेब उत्तम सरवदे, साहाय्यक प्राध्यापक, वीर वाजेकर महाविद्यालय, फुंडे, उरण, जि. रायगड ४००७०२;<br>चलभाष : ९९८७२ ९१४५१
- जया परांजपे, सेवानिवृत्त प्राध्यापक, हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे


**विशेष सूचना :**

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन'** हे विद्वत्प्रमाणित नियतकालिक असून लेखकांनी प्रकाशनार्थ पाठवलेले लेखन संबंधित क्षेत्रातील तज्ज्ञांशी सल्लामसलत करून, त्यानुसार दुरूस्त करून अथवा पुनर्लेखन करून प्रकाशित केले जाते. या नियतकालिकातील लेखात कोणतीही त्रुटी राहू नये असा प्रयत्न केला जातो. त्यामुळे लेखकांनी पाठवलेले लेखन लगेचच्या अंकात प्रकाशित होईल, याची खात्री देता येत नाही. लेखाची दुरुस्ती किंवा लेखाचे पुनर्लेखन स्वत: लेखकानेच करायचे असते. याबाबतीत संपादक मंडळ लेखकाला सारे तपशील ई-पत्राने अथवा टपालाने कळवते. तरी कृपया सर्व लेखकांनी आपल्या पत्रिकेचा दर्जा राखण्यासाठी परिषदेला सहकार्य करावे, ही विनंती.



अनुक्रमणिका

संपादकीय....

## शुभ बोल नाऱ्या!

आनन्द काटीकर

'तारे जमीं पर' या चित्रपटात कला-शिक्षक आमीर खान एका 'सोलोमन आयलॅन्ड'ची कथा सांगतात. तिथे राहणारे आदिवासी कोणतेही जिवंत झाड कापत नाहीत. जे झाड कापायचे असेल त्या झाडाभोवती सगळे जमतात. त्या झाडाला रोज शाप देतात. असे झाले की काही आठवड्यांमध्ये, वृक्ष रुक्ष होतो आणि आपोआपच मृत होतो. माणसाच्या भाषेत खरेच एवढी ताकद आहे? आपल्या तोंडून निघणाऱ्या शब्दांना मंत्राचे सामर्थ्य असते? असे प्रश्न या पार्श्वभूमीवर उभे राहतात.

आपण बोलताना आपल्या मनाला सुचेल तसे बोलतो. मात्र हे बोलताना परा-पश्यन्ति-मध्यमा आणि वैखरी अशा वाणीच्या ४ अवस्था आपण सहजपणे पार करत असतो, याची आपल्याला जाणीवही नसते. या बोलीमागे असणाऱ्या चंचल मनाचा सूक्ष्म अभ्यास विविध ऋषींनी, विचारवंतानी केलेला आहे. मानवी संस्कृतीचा विकास हा अशा मनाच्या संस्कारांतून घडलेला आहे. या मनाला संस्कारित करण्याचे काम भाषेमार्फत होते. मनापासून निघालेले शब्द, हे त्यामागे असणाऱ्या प्रामाणिक, सातत्यपूर्ण, सखोल मानसिकतेमुळेच मंत्राच्या दर्जाला पोहोच़तात. नेहमी चांगले बोलावे याचे कारण आपल्या मनाला तुम्ही सतत जे सांगत राहाल, त्याप्रमाणे मन काम करण्यास, त्या दिशेने जाण्यास प्रारंभ करते. विधायक टीकेच्या नावावर तुम्ही सतत एखाद्याचा किंवा स्वत:चा पाणउतारा करत गेलात, तरीही तुम्हाला आवश्यक ते बदल होऊ शकत नाहीतच, उलट ती व्यक्ती विकसित होऊच शकत नाही.

आपले किंवा दुसऱ्याचे व्यक्तिमत्त्व घडवायचे असेल तर त्या मनाला पोषक, पूरक सकारात्मक गोष्टी सांगाव्या लागतात. विष्णुशर्माने लिहिलेले 'पंचतंत्र' हे असेच दिशादर्शक आहे. माता जिजाबाईनी लहानग्या शिवबाला रामायण-महाभारतातील गोष्टी सांगून त्याचे हे अंतर्मन संस्कारित केले. आय. ए. एस. झालेल्या एका मराठी मुलाने, नियमितपणे अभ्यास करताना, घरातील एका भिंतीवर सतत दिसत राहील अशा ठिकाणी





अनुक्रमणिका

'मी आय.ए.एस. होणार' असे लिहून ठेवले होते. किंवा एक ग्रामीण अशिक्षित स्त्री 'माझं पोरगं कलेक्टर होणार' असं सतत म्हणत राहिली, जॉर्ज वॉशिंग्टन कार्व्हर यांनी वर्णभेदाचे दु:ख कुरवाळत न बसता, मनाशी निश्चित खूणगाठ बांधून समाजाचे प्रश्न सोडवण्याला प्राधान्य दिले, अपंगत्वावर मात करणारी नसीमादीदी सर्वच अपंगांचा आदर्श ठरली, ही सारी मनाच्या मशागतीचीच उदाहरणे होत. अशी सकारात्मक मने समाजाची सामूहिक नेणीवही घडवतात. अशा विधायक मनांचा, आजूबाजूच्या वातावरणाचा, मानवी इतिहास आणि परंपरेचा प्रभाव त्या सामूहिक मनावर पडतो. अशा सामूहिक मनांमुळेच; शिवरायांच्या मृत्यूनंतरही औरंगजेब प्रचंड सैन्यासह कठोर परिश्रम करूनही हिंदवी स्वराज्य बुडवू शकला नाही, शिस्तप्रिय आणि प्रचंड कष्टाळू जपानी समाज निर्माण झाला, आणि सार्वजनिक ठिकाणी अतिशय शिस्तीने वागणारा आजचा अमेरिकन, युरोपीय, सिंगापुरी समाज अस्तित्वात आला.

सामूहिक मनाला योग्य दिशा देण्याचे काम प्रार्थना करते. प्रार्थना म्हणजे ईश्वराची आराधना किंवा याचना असाच बऱ्याच जणांचा समज आहे. पण वास्तविक प्रार्थना म्हणजे समाजाच्या उज्ज्वल भविष्यकाळासाठी समाजानेच केलेली वर्तमानकाळातील तरतूद आहे. ऋग्वेदातील ॐ संगच्छध्वं.... किंवा ॐ सहनाववतू.....ही प्रार्थना; आपण एकत्र येऊ, एका दिशेने पुढे जाऊ, अशी सकारात्मक ऊर्जा देणारी, समाजाला पुढे घेऊन जाऊ पाहणारीच आहे. आधुनिक काळात प्रत्येक देशाने निवडलेले राष्ट्रगीत हे अशी दिशा देणारी प्रार्थनाच आहे. सुप्रसिद्ध पोलीस अधिकारी आणि क्रीडा समुपदेशक भीष्मराज बाम यांनी आपल्या एका व्याख्यानात आणि नंतर एका लेखात, सामूहिक प्रार्थनेमुळे खेळाडूंचे मनोबल कसे वाढवले जाऊ शकते, याविषयी फार सुंदर विवेचन केलेले आहे.

सारा समाज जेव्हा एकाच दिशेने, एकाच ध्येयाने पुढे जाऊ लागतो, तेव्हा ते उद्दिष्ट सहजसाध्य असते. 'Our Next X'mas in Jeruslem' असे २००० वर्षे म्हणत राहिलेले ज्यू १९४८ मध्ये इस्राईल नावाचे स्वतंत्र राष्ट्र निर्माण करू शकले, ते अशा सामूहिक मनामुळेच. राखेतून उठणाऱ्या फिनिक्स पक्षासारखे अभिमानाने उभे राहिलेले जपान नावाचे राष्ट्र, आपल्या देशाला आधुनिक करण्याचे ठरवून सारी शक्ती

एकवटणारे सिंगापूरवासीय, आपल्या देशाला स्वतंत्र करण्याच्या ध्येयाने झपाटलेली स्वातंत्र्यपूर्व भारतीयांची पिढी अशी असंख्य उदाहरणे देता येतील. मात्र स्वातंत्र्योत्तर काळात, इंग्रजांच्या चतुर धोरणांमुळे भारतीय संस्कृतीविषयी न्यूनगंड निर्माण झालेली पिढी येथे निर्माण झाली आणि ही सामूहिक नेणिवेची सकारात्मक शक्ती आपण गमावून बसलो.

शब्दांत अशी शक्ती असते, हे केवळ परंपरा सांगते म्हणून मानायचे का त्यामागे काही अभ्यास आहे? भारतीय साहित्य परंपरेत ग्रीकांसारख्या शोकांतिका नाहीत. आपल्या साहित्यातील नायक-नायिकेच्या जीवनात करूण प्रसंग येतात, पण त्यातून तावून सुलाखून निघणे हे सातत्याने दिसते. मग तो राजा हरिश्चंद्र असो, जमदग्नी-परशुराम-रेणुका असो, चिलयाबाळ असो किंवा अगदी सत्यनारायणातला साधुवाणी असो. शेवट गोड होणे जसे महत्त्वाचे तसेच सतत चांगला विचार करणेही महत्त्वाचे! अशी धारणा येथे रूजलेली दिसते. भाषेत/व्यवहारात 'शुभ बोल नाऱ्या' सारख्या म्हणी का रुजल्या असतील? किंवा साहित्यात फक्त सुखांतिकाच का रुळल्या असतील?

अशा सर्व प्रश्नांचा शोध घ्यायला सुरुवात केली की भारतीय संस्कृती एकात्म विचार करणारी आहे, हे सूत्र समोर येते. कोणत्याही गोष्टीचा अभ्यास करताना विश्लेषण करून अभ्यास करायला हवाच, पण उत्तर मात्र संश्लेषित हवे अशी काहीशी वृत्ती येथे दिसून येते. सारी सृष्टी एकमेकांशी जोडलेली आहे. वरवर पाहता काहीही संबंध नाही असे दिसत असले तरी त्यांमधील अंत:प्रवाह वाहते असतात, खळाळते असतात. त्यांचा विचार केला नाही तर उपाय चुकणार, हे नक्की! म्हणूनच एकात्म विचार करायला हवा, असे आयुर्वेद सांगतो, यज्ञ सांगतो, साहित्य सांगते आणि भाषाही सांगते. या एकात्म विचारांतूनच, सारे विश्व चैतन्यमय आहे, हे सांगितले. चराचरांत जीव आहे, तोच ईश्वर आहे असा अद्वैतवाद येथे मांडला गेला. मनुष्य आणि ईश्वर यांच्यातील द्वैत नाहीसे करून 'अहं ब्रह्मास्मि' किंवा 'अत:दीप भव|' असे नारे दिले गेले.

या एकात्म विचाराच्या आधारेच; डॉ. माशरु इमोटो नावाच्या जपानी अवलीयाने तब्बल बावीस वर्षे पाण्यावर संशोधन केले आणि निष्कर्ष काढला की पाण्याला जीव असतो ! होय, पाणी सजीव असते. त्याला स्वभाव असतो. पाणी रागावते, पाणी रुसते,





अनुक्रमणिका

पाणी प्रफुल्लित होते इतकेच काय पण पाणी, ऐकू शकते, वाचू शकते, पाहू शकते.... माणसाचे मन जे जे विचार करते ते ते सर्व पाणीही करू शकते. जगदीशचंद्र बसूंनी वनस्पतींच्या सजीवत्वाचे संशोधन जगापुढे मांडले. म्हणूनच भारतीय साहित्यात; आश्रमातील पशू-पक्षी-वनस्पतींशी बोलणारी शकुंतला डोकावते, सीतेचा शोध घेताना वनस्पतींकडे चौकशी करणारा राम दिसतो, सीतेसाठी लढणारा जटायू आढळतो, मेघांद्वारे आपल्या प्रियतमेला प्रेमपत्र पाठवणारा यक्ष सापडतो, आपल्या मळ्यावर अलोट प्रेम करणारा सावतामाळी दिसतो, आपल्या व्यवसायातच विठ्ठल पाहणारे गोरा कुंभार, नरहरी सोनार, सेना न्हावी इत्यादी संत उठून दिसतात. ही एकात्मता साऱ्या समाजात पिढ्यानपिढ्या रुजलेली असल्यानेच बा.भ.बोरकरांसारखा आधुनिक कवीही माधव गडकरी यांना एका मुलाखतीत, "नेहमी खरे बोलावे कारण प्रत्येक ठिकाणचा एक वास्तुपुरुष असतो. तो सतत तथास्तु! असे म्हणत असतो. तुम्ही वाईट बोललात तर त्यालाही तो आशीर्वाद देतो. हे टाळण्यासाठी नेहमी शुभ चिंतावे." असे सांगताना आढळतो.

माणसाने सतत चांगले करण्याची भाषा करावी, उत्तम-उदात्त-उन्नत घडण्याची आस धरावी. कायम सकारात्मक विचार करावा, आशावादी राहावं, असं सांगणारी भारतीय संस्कृती निरनिराळ्या माध्यमांतून अशी पदोपदी भेटत राहते. म्हणूनच आमची पिढी आजीपासून ऐकत आली **'शुभ बोल नाऱ्या!'**

संदर्भ -

१. मना सज्जना, भीष्मराज बाम

२. एकात्म मानव दर्शन, भारतीय विचार साधना प्रकाशन, पुणे

३. जगदीशचन्द्र बसू, दिलीप कुलकर्णी, राजहंस प्रकाशन, पुणे

४. साहित्यातील हिरेमोती, माधव गडकरी

# कवितेचे भाषांतर

प्रदीप गोपाळ देशपांडे

भाषांतराच्या माध्यमातून जगातील विविध भाषांमधील साहित्य केवळ भाषांतरितच होते असे नाही. तर, भाषांतरामुळे जगातील विविध वाङ्मयीन संस्कृतींना परस्परांचे संदर्भ प्राप्त होतात, जाणिवेला आणि जगण्याला वैश्विक विस्तार लाभणे अधिक सुसंस्कृतपणे शक्य होते. उत्कृष्ट भाषांतराचे निकष काय असू शकतात ह्याविषयी निश्चित शास्त्रीय मीमांसा मराठी साहित्याभ्यासात आज तरी अपुरी आहे. भाषांतर मीमांसेला सैद्धान्तिक चौकट देणे ह्यापेक्षाही भाषांतर प्रक्रियेत भाषांतरकाराला जाणवणारे प्रश्न, त्याची वैयक्तिक निरीक्षणे, भाषांतर प्रक्रियेत त्याची विशिष्ट स्थळांवर होणारी कोंडी व तिच्यामधून त्याने आपल्या परीने काढलेले मार्ग ह्या संदर्भात त्याने दिलेल्या प्रांजळ कबुलीचा उपयोग भाषांतरमीमांसेला सैद्धान्तिक स्वरूप प्राप्त करून देण्यास व्हावा ह्या हेतूने काही निरीक्षणे नोंदविण्याचा हा प्रयत्न. प्रस्तुत लेखात कवितेच्या भाषांतराच्या संदर्भात येणाऱ्या समस्यांची व अनुभवांची चर्चा प्रामुख्याने केली आहे.

आदिम काळापासून मानवाच्या केवळ संप्रेषणाचे साधन म्हणून उपजलेली भाषा पुढे भाषिक संस्कृतीत परिणत होत गेली. समूहांच्या नित्यव्यवहारात वापरल्या जाणाऱ्या भाषेत जो नेमकेपणा आवश्यक असतो तो एका व्यक्तीच्या मानसिक अवकाशात होणाऱ्या जाणिवांच्या अभिव्यक्तीच्या भाषेत अभिप्रेत असतोच असे नाही. त्यामुळे, विशिष्ट वस्तूंना विशिष्टच संज्ञा अशी व्यवस्था असलेली समूहांची भाषा, व व्यक्तिपरत्वे विविध अनुभव, भावना, जाणिवा प्रकट करणारी व्यक्तिनिष्ठ भाषा, असे भाषेचे दोन सर्वसाधारण प्रांत होतात. जगातील सर्व समाज समूहांमधील व्यावहारिक संदेशवहनासाठी योजिलेल्या भाषेपासून ते विविध शास्त्रांमधील मीमांसेला आवश्यक असणाऱ्या भाषेपर्यंतच्या प्रांताला सार्वत्रिकता आहे. तसेच अशा भिन्न भाषांच्या परस्परांमधील भाषांतरक्षमतेला देखील सार्वत्रिकता आहे. साहित्याच्या भाषेत मात्र जीवनाच्या सार्वत्रिकतेच्या प्रवाहांमधून वाहणारे जगणाऱ्या व्यक्तींच्या वैयक्तिकतेचे मानसिक अंधार -उजेड असतात, आणि त्यांच्या अभिव्यक्तींच्या तऱ्हा व्यक्तींना समूहापासून अलग पाडणाऱ्या असतात. भाषेच्या ह्या विविध तऱ्हाच विविध वाङ्मयीन संस्कृतींना समृद्ध करीत असतात.

भाषेच्या अंत:स्तरावरील संरचना ही सार्वत्रिक व सर्व मानवजातींत समान असते आणि विविध भाषांमधील भेद हे भाषेच्या पृष्ठस्तरावरच आढळतात हा भाषेच्या शास्त्रीय मीमांसेत अनेक भाषाशास्त्रज्ञांनी आजवर काढलेला एक प्रमुख निष्कर्ष आहे.



अनुक्रमणिका

गणितशास्त्र व चिनी भाषा हे नमुने समोर ठेवून भाषेचे वैश्विक व्याकरण तयार करता येऊ शकते असा विश्वास भाषेच्या वैश्विकतेचा सिद्धान्त मांडणाऱ्या भाषाशास्त्रज्ञांना[१] (आफ्टर बेबल युनिवर्सॅलिस्ट) वाटतो. भाषांतर हे यशस्वीपणे करता येऊ शकते, कारण भाषांच्या अंत:स्तरावर जी जनुके, जी ऐतिहासिक, सामाजिक वैश्विके (युनिव्हर्सल्ज) असतात त्यातूनच सर्व भाषांची व्याकरणे निर्माण होतात. विविध भाषांच्या प्रत्येक वाक्प्रचारात व आविष्कार पद्धतीत ही वैश्विके कार्यरत असतात. भाषांतरकाराला दोन भाषांच्या पृष्ठस्तरांवरील भिन्नतांमधून खाली उतरून त्यांच्या अस्तित्वाला कारक असणाऱ्या समधर्मी तत्त्वांना कार्यान्वित करता येते, व कोणत्याही साहित्यकृतीचे भाषांतर करता येते अशा निष्कर्षाप्रत भाषांतरमीमांसेतील भाषिक वैश्विकतेचा सिद्धान्त मांडणारी युनिवर्सॅलिस्ट प्रणाली आलेली आहे.

एकीकडे कोणत्याही साहित्यकृतीचे कोणत्याही भाषेत भाषांतर हे करता येतेच असा सामान्यीकरणाकडे झुकणारा भाषेचा वैश्विकतावादी सिद्धान्त, तर दुसरीकडे, एका भाषेतील साहित्यकृतीचे दुसऱ्या भाषेत एकनिष्ठ भाषांतर होऊच शकत नाही अशी टोकाची भूमिका घेणारा मूलकणवादी (मोनॅडिस्ट) सिद्धान्त मांडणारी एक प्रणाली आहे. ह्या प्रणालीच्या मते मुळाबरहुकुम भाषांतर अशक्य आहे. भाषांतराद्वारे भाषांतर कृतीत संबंधित दोन भाषिक कृतींमधील ढोबळ साम्य, व संप्रेषणाचे फार तर प्राथमिक हेतू साध्य करणारी समरूपता साधता येते. एखाद्या साहित्यकृतीत अंतर्भूत व अभिप्रेत असलेल्या समृद्ध अशा पृथगात्मतेची हानी भाषांतरात अटळच आहे असे मूलकणवादी सिद्धान्ताचे प्रतिपादन आहे. भाषांतर मीमांसेत ह्या दोन्हीही टोकाच्या भूमिकांचा संतुलित मध्य साधता येणे अगदीच अशक्य नाही.

साक्षात व इंद्रियगोचर ह्यांकडून अमूर्त व इंद्रियातीत जाणिवांच्या अभिव्यक्तीची धडपड हा मानवी चैतन्याचा उत्पत्तीपासून ते संस्कृतीपर्यंतचा प्रवास सार्वत्रिक आहे. ह्या प्रवासात प्रत्यक्षाच्या जाणिवेचे ग्रहण व संप्रेषण हे विविध भाषिक व्यवहारांमध्ये सदैव समरूपी होत आलेले आहे. परंतु अमूर्त व इंद्रियातीत जाणिवांचे ग्रहण व संप्रेषण हे भिन्न भाषांच्या व्यवहारात अधिकाधिक वैविध्याने वैयक्तिकतेत रूपांतरित होत असते. साहित्यात ह्या दुसऱ्या प्रकारची भाषा प्रधान भूमिका बजावत असते. भाषेची वैश्विकतावादी प्रणाली ही अंतत: प्रमाणीकरण व सामान्यीकरण ह्यांकडे अधोगत होण्याची भीती असते. आणि जिथे प्रमाणीकरण व सामान्यीकरण होते तिथे वैयक्तिकता व तिची स्वत:ची वैशिष्ट्ये नाहीशी होतात. भाषांतराच्या प्रक्रियेत भाषांतरकार जेव्हा एकटा पडतो तेव्हा भाषेच्या वैश्विकतेच्या सिद्धान्ताचा आशावाद त्याला पोकळ वाटतो,

तर मूलकणवादी भाषासिद्धान्ताचा यथार्थ भाषांतराच्या अशक्यतेचा दावा खरा ठरण्याची शक्यता त्याला भेडसावते. चांगल्या भाषांतरकाराला ह्या दोन्ही समस्यांमधून वाट काढावी लागते, व ती काढता येते. कवितेच्या भाषांतरात ह्या समस्या भाषांतरकाराला जास्तीत जास्त अडचणीत आणतात हे खरे असले तरी कविता ह्या साहित्यप्रकाराचा अंत:स्तरावरील विविधतेने समृद्ध असलेला गूढ पोत भाषांतरात टिकवून ठेवण्यासाठी मूलकणवादाच्या अतिनैतिकतेची सोयीप्रमाणे बूज राखून, आणि भाषांतर प्रक्रियेत आडवे येणारे अशक्यतेचे अडथळे पार पाडण्यासाठी भाषेच्या वैश्विकतेच्या सिद्धान्ताच्या उदारमतवादाचा आधार घेऊन भाषांतर हे जास्तीत जास्त एकनिष्ठ करता येते. अर्थात्, भाषांतर प्रक्रियेत काही स्थळे भाषांतरकृती परिपूर्ण होऊ देत नाहीत हे मान्य करावेच लागते.

एका भाषेतील कवितेचे भाषांतर दुसऱ्या एकवंशी भाषेत करताना मूळ कवितेतील लय, वृत्त, यमके, अनुप्रास, नादानुकार इत्यादी नादसौंदर्य निर्माण करणारे भाषेचे घटक बऱ्याच प्रमाणात टिकवता येतील. (उदा० मराठीतून हिंदी, बंगाली, गुजराथी, तमीळ, कन्नड वगैरे) परंतु मूळ कवितेचे भाषांतर इंग्रजीसारख्या भिन्नकुलीन भाषेत करताना मूळ कवितेतील नादसौंदर्याची निर्मिती करणाऱ्या ह्या भाषा-घटकांची हानी होणे अटळ होऊ शकते. ग्रेस ह्यांच्या वेगवेगळ्या कवितांमधील काही ओळींची उदाहरणे घेऊ —

*दुपारचे सचित्र ऊन मृगजळांस लांबवी*
*अनंत इंद्रियांतले स्वतंत्र शोक जागवी*[२]

ह्या ओळींमधून आघातांनी निर्माण होणारे सौंदर्य किंवा

*नदीच्या काठाने मरण मिटली मंद चरणे*[३]

ह्या ओळीमधील अनुप्रास, किंवा ...

*जिथे थांबावे तू तिथुन झरते सांद्र करुणा*[४]

किंवा वामनपंडितांच्या

*शराते चापाते त्यजुनि वदला गद्‌गद रवे*[५]

ह्या ओळींमधील *सांद्र, गद्‌गद* अशा शब्दांमधून निर्माण होणारा नादानुकार आणि ध्वनितत्त्वांमधून निर्माण झालेले नादसौंदर्य हे ह्याच ओळींच्या इंग्रजी भाषांतरात टिकवणे अशक्य आहे. आणि आशयद्रव्यापेक्षाही नादसौंदर्य हेच ज्या कवितांचे प्रधान वैशिष्ट्य आहे त्या कवितांचे इंग्रजी भाषांतर जर नेमके हेच वैशिष्ट्य हरवून बसत असेल तर त्या भाषांतराला फारसे प्रयोजन उरत नाही.

एखाद्या कवितेचे दृश्यस्वरूप व त्याचे सौंदर्य हे ओळींचा विन्यास, शब्दविन्यास,





अनुक्रमणिका

चिन्हव्यवस्था अशा प्रमुख घटकांमधून प्रकट होते. मूळ कवितेचे भाषांतर अन्य एकवंशी भाषेत केले असता कवितेच्या दृश्यस्वरूप सौंदर्याचे हे निर्मिती-घटक भाषांतरित कृतीतही बऱ्याच अंशी टिकवता येतील. परंतु भिन्नकुलीन भाषेतील भाषांतरात हे घटक तुलनेने कमी प्रमाणात टिकू शकतील. अशा भाषांतरात ते जास्तीत जास्त टिकवता येणे हेच भाषांतरकाराचे यश असते. अर्थात भाषांतरित कृती ही मूलसाहित्याचा एक भेद असते हे विसरता येत नाही.

मूळ कवितेत अनेकदा श्रद्धेच्या प्रांतातून आलेले शब्द येतात. (उदा० पसायदान, प्रपंच, परमार्थ, भाव, भवसंसार). एकवंशी भाषेत अशा कवितांचे भाषांतर करताना ही पदे तशीच टिकवून ठेवता येतीलही. परंतु इंग्रजीसारख्या भिन्नकुलीन भाषेत ह्या कवितेचे भाषांतर करत असताना शब्दश: भाषांतर शक्य होणार नाही. कारण असे शब्द वेगवेगळ्या संस्कृतींमधील श्रद्धासिद्धांतांमधून आलेले असतात. तथापि, 'शब्दास प्रतिशब्द' ह्या पद्धतीने हे भाषांतर शक्य नसले तरी जराशा स्पष्टीकरणात्मक शैलीचा आधार घेऊन अशा शब्दांच्या अर्थांना मूळ भाषेतील कवितेत असलेले स्थान हे भाषांतरकृतीत देखील देता येते. येथे शब्दार्थ-विचार सिद्धान्ताचा आधार उपयोगी ठरतो. समर्थ रामदासांच्या मी इंग्रजीत भाषांतर केलेल्या काही वेच्यांमधील हे उदाहरण घेऊ –

*आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थ विवेका ।*

*येथे आळस करू नका । विवेकीहो ।।*

ह्या ओळींमधील प्रपंच, परमार्थ ह्या शब्दांना इंग्रजीसारख्या भिन्नकुलीन भाषेत प्रतिशब्द नाहीत, त्यामुळे कमीत कमी स्पष्टीकरणात्मक होऊन त्यांचे इंग्रजीत शक्य तितके सौंदर्य टिकवणारे भाषांतर असे होऊ शते –

First, look after the business of life neatly,
and, then take the spiritual goal for consideration;
Do not be indolent here,
O judicious folk...[६]

मूळ भाषिककृतीतील एखाद्या शब्दासाठी लक्ष्यभाषेत समानार्थी शब्दच अस्तित्वात नसेल तर त्या शब्दातील आशय क्वचित संयोगचिन्हाने दोन किंवा अधिक शब्द जोडून लक्ष्यभाषेत आणणे शक्य असते. खरे तर ही भाषांतरकारासाठी अभिव्यक्तीच्या नव्याच शैलीच्या निर्मितीची संधी असते. शेख महंमद ह्यांच्या खालील ओळींच्या मी इंग्रजीमध्ये केलेल्या भाषांतराचे उदाहरण घेऊ –

*ऐसे केले या गोपाळे । आता नाही सोवळे ओवळे ।*

Such is done by God Gopal

that now nothing is left sacramentally aloof or non-aloof[७]

अनेकदा मूळ कवितेत भावनिर्देशक पदे येतात. अशा पदांना इतर एकवंशी भाषांमध्ये समानके उपलब्ध असतात, आणि म्हणून त्यांचे अशा भाषांमध्ये उत्तम भाषांतर होऊ शकते हे पुन्हा सांगण्याची गरज नाही. परंतु इंग्रजीसारख्या भिन्नकुलीन भाषेत भाषांतर करताना शब्दास प्रतिशब्द अथवा समानके उपलब्ध नसली तरीही काही सामासिक शब्दांची निर्मिती करून मूळ कवितेचे सौंदर्य लक्ष्यभाषेतही टिकवता येते. नामदेवांच्या ह्या ओळींचे उदाहरण घेऊ –

*तू माझी पक्षिणी मी तुझे अंडज । क्षुधे पीडलो मज विसरलीसी ।*

*तू माझी कुरंगी मी तुझे पाडस । गुंता भवपाश सोडी माझा ।।*

ह्या ओळींचे मी इंग्रजीत केलेले भाषांतर असे –

You are my mother-bird, and I – your egg-born

I am afflicted by hunger, you have forgotten me;

You are my doe, and I – your fawn,

Release me from the tangled snare of worldliness.[८]

वरील उदाहरणात मूळ मराठी भाषेतील पक्षिणी, अंडज अशा शब्दांना मूळचा लिंगभेद स्पष्ट करणारी समानके इंग्रजीत नाहीत, तरी mother-bird, egg-born, अशा सामासिक शब्दांची इंग्रजीत निर्मिती करून भाषांतर केले आहे. *गुंता भवपाश*मधील *भवपाश* ह्या शब्दालाही इंग्रजीत समानक नाही. त्यामुळे tangled snare of worldliness अशी जराशी विश्लेषणात्मक रचना इंग्रजीतून केली आहे.

कित्येकदा कवितेच्या भाषांतरात मूळ कविता किंवा कवितेतील काही ओळींची अर्थनिश्चिती करणे अत्यंत अवघड होते. भाषांतरकाराने केलेल्या अर्थनिर्णयावरून त्याला ती कविता कशी समजली, किंवा कशी समजलेली नाही हे उघड होते. खरे तर 'भाषांतर' हा कोणतीही कविता अथवा साहित्यकृती समजून घेण्याचा एक उत्कृष्ट मार्ग आहे.

भाषांतरकाराची गाठ क्वचित काही 'विनोदी' कवितांशी पडते. अशा कवितांचे भिन्नकुलीन भाषेत भाषांतर कसे अशक्य होते हे पाहणेही उद्बोधक होईल. निस्सीम एझिकिएल ह्यांच्या *द पॅट्रियट* ह्या इंग्रजी कवितेचे उदाहरण घेऊ –

*I am standing for peace and non-violence.*

*Why world is fighting fighting*

*Why all people of world*
*are not following Mahatma Gandhi,*
*I am simply not understanding.*
*Ancient Indian wisdom is 100% correct.*
*I should say even 200% correct.*
*But modern generation is neglecting*
*Too much going for fashion and foreign thing...*[१]

आणि ही कविता अशीच पुढे जाते. ह्या किंवा अशा कवितेचे मराठी किंवा तिच्या इतर भगिनीभाषांमध्ये भाषांतर मुळीच अशक्य नाही. तथापि ते करणे मी टाळेन. त्याची कारणे अशी –

१. भारतीय महानगरांतील भाषिक व्यवहारात ज्या इंग्रजीचा वापर होतो ती इंग्रजी भाषा स्वत:च्या व्याकरणापासून व शुचितेपासून दूर गेलेली आहे.

२. भारतीय महानगरांत – आणि ढोबळ मानाने, एकूण भारतातच – इंग्रजी भाषेच्या वापरामागे 'एकमेकांचे म्हणणे किमान दैनंदिन व्यवहार पार पाडण्याइतके समजावे', आणि 'प्रतिष्ठेची खोटी संकल्पना' असे दोन भिन्न परंतु प्रधान हेतू आहेत.

३. ती एक 'गरज' म्हणून वापरणारा वर्ग भारतात मोठा आहे. येथील बहुभाषिक समाज इंग्रजीचा वापर 'गरज' म्हणून करतो तेव्हा त्या इंग्रजीच्या मुळाशी विविध प्रादेशिक भाषांचा, त्यांच्या व्याकरणांचा व शैलींचा नकळत पडलेला प्रभाव असतो. ह्याचे पर्यवसान प्रमाणेतर इंग्रजी आणि ती बोलणाऱ्या व्यक्तीकडून अजाणते निर्माण झालेल्या विनोदात होते. हा नकळत निर्माण झालेला विनोद, आणि प्रमाणेतर व हास्यास्पद इंग्रजी हेच ज्या कवितेचे वैशिष्ट्य आहे त्या कवितेचा किंवा अशा साहित्यकृतीचा अशा इंग्रजीतून पुन्हा भारतातील कोणत्याही प्रादेशिक भाषेत भाषांतरातून होणारा प्रवास हा त्या कवितेचे आहे ते वैशिष्ट्यही घालवून बसतो, आणि अर्थहीन होतो. कवितेतील – फार काय, कोणत्याही साहित्यकृतीतील विनोद भाषांतरकृतीत तसाच जपता येईलच असे नाही. कारण विनोद हा स्थलविशिष्ट असतो. हास्याची कारणे जगात प्रत्येक संस्कृतीत वेगवेगळी असू शकतात. दु:खाच्या कारणांना मात्र सार्वत्रिकता आहे. म्हणूनच 'विनोद' हे आशयद्रव्य असलेल्या साहित्यकृतींपेक्षा 'दु:ख' हे आशयद्रव्य असलेल्या साहित्यकृतींचे जगातील कोणत्याही भाषेत भाषांतर होऊ

शकते. *हॅम्लेट*ची मराठी भाषांतरे आगरकरांच्या *विकारविलसित*नंतर थेट आजच्या पिढीतील भाषांतरकारांनाही नव्याने करता येऊ शकतील. परंतु चिं.वि. जोश्यांच्या साहित्यकृतींचे इंग्रजीत उत्तम भाषांतर कितपत शक्य आहे?

मानव आणि त्याच्या सभोवतालचा परिसर व त्यावरील निसर्ग ह्यांमध्ये अत्यंत गुंतागुंतीचे, व्यामिश्र असे एक खास नाते असते. आपल्या भूमीवरील समृद्ध, सुंदर, चैतन्यदायी निसर्गावर प्रेम करण्याचा, तिला प्रेम, उत्सव, विधी, कर्तव्य ह्या माध्यमांतून संतुष्ट करण्याचा, तसेच तिच्यावरील खडतर, वांझ, वैरभावी परिसरांविषयी उद्वेग वाटण्याचा अधिकारही फक्त आपलाच आहे ही उपजत हक्काची प्रेरणा (पझेसिव्ह इन्स्टिंक्ट) मानवाला त्याच्या मातृभूमीशी बांधून ठेवते. आपल्या मातृभूमीसाठी, आपल्या गावाकडील मातीसाठी आपण आपले सर्वस्व देणे लागतो ही भावना, हे भूमिदायित्व (Geopiety) विविध देशांतील संस्कृतींमध्ये प्राणभूत महत्त्वाचे असते. ह्या भूमिदायित्वाच्या मुळांशी त्या-त्या संस्कृतींमधील पुराणकथा, इतिहास व भूगोल असतात. काझी सलीम ह्या महत्त्वाच्या समकालीन भारतीय उर्दू कवीची *नागफनी : पलेस्तिनी मुजाहिदोंके लिये* ह्या कवितेच्या काही ओळी उदाहरणादाखल घेऊ –

*ऐ खुदा*
*हिजरतोंकी घडी है*
*सरज़मीं तेरे वादे की*
*शायद क़रीब आ चुकी है*
*कोई जीकर दिखाए*
*मौतपर फ़ताह पाने के अरमाँ में*
*परवरदिगार*
*ये तो तेरा करम है*
*के रेत का दूद उतरा है*
*बगूलों के पिस्तान में...*

ह्या ओळींचे मी मराठीत केलेले भाषांतर असे –

हे खुदा,
वनवासी भ्रमंतीची वेळ आहे
तू देऊ केलेली वायद्याची भूमी
बहुधा जवळ येऊन ठेपलीये
कुणी जगून दाखववं मरणावर विजय मिळवण्याच्या ईर्ष्येनं





अनुक्रमणिका

परवरदिगारा,
ही तुझीच तर कृपा आहे
की वाळवंटाचं दूध उतरलंय वावटळींच्या स्तनांमध्ये...[१०]

उपाशी मादीदेखील आपल्या सुकलेल्या स्तनांतून दूध पाजवून आपल्या पिलांना जगवते, तशी ही ओसाड वाळवंटाची भूमी तिच्या पुत्रांना वावटळींच्या स्तनांत उतरलेल्या दुधाच्या आभासावर का होईना, पण जगवतेच. भाषांतरकाराला मूळ साहित्यकृतीच्या गाभ्याशी वसलेल्या स्वत:ची भूमी व स्वत: ह्यांमधील परस्परकर्तव्यभावनेची, भूमिदायित्वाची जाण असणे आवश्यक आहे. विविध वाङ्मयीन कृतींमधल्या दु:खाच्या जातकुळी देखील विविध असतात. दु:खाचे वेगवेगळे पोत व प्रकृती समजण्यासाठी भाषांतरकाराला आपल्या परीने दु:खाचे अध्यात्म समजून घ्यावे लागते. ह्याही कारणासाठी भिन्न संस्कृतींमधील भूमिदायित्वाची जाण भाषांतरकाराला असणे उपकारक असते.

मूळ कवितेतील सौंदर्य-घटक भाषांतरकृतीत येऊच शकत नसतील तर ते घटक वजा होऊन करावे लागलेले मुक्त भाषांतर शक्य तितके मितव्ययी असावे. 'मुक्त' भाषांतरातील 'मुक्ती' ही बंदिस्त असते ह्याचे भान भाषांतरकाराला आवश्यक आहे. परंतु यथार्थ भाषांतराच्या अनेक शक्यता उपलब्ध असतानाही एखादा भाषांतरकार स्वैर अनुवाद करू लागला तर केवळ अवघड वाटेवरील आव्हाने टाळण्यासाठी निवडलेली ही 'सोयीची वाट' भाषांतरकलेचे गांभीर्य कमी करते असे वाटते.

मूळ इंग्रजीसारख्या भाषेतील एखाद्या कवितेत त्या भाषेची पोटभाषा असणाऱ्या बोलभाषेत अथवा क्षेत्रीय भाषेत व्यक्त झालेला काही भाग मराठी सारख्या भिन्नकुलीन भाषेत भाषांतरित करताना एक धोका संभवतो. भारतात अनेक भाषा व त्यांच्या पोटभाषा – प्रादेशिक भाषा, बोलभाषा – आहेत. त्यांतील कोणत्या पोटभाषेची, बोलभाषेची निवड मूळ इंग्रजी अथवा युरोपियन भाषेतील कवितेतील बोलभाषेत लिहिलेल्या भागाचे भाषांतर करताना करायची? अशी निवड करताना मूळ कवितेतील बोलभाषेचा भाग हा भाषांतरकाराने निवडलेल्या भिन्नवंशी भाषेतील एखाद्या बोलभाषेत भाषांतरित केला असता मूळ कवितेतील बोलभाषा ही तुलनेने अधिक नागर उरते असे आढळून आल्यास भाषांतरकृती ही अवनत (रिडक्शनिस्ट) होण्याचा धोका असतो. टी.एस. एलियट ह्यांच्या *द वेस्ट- लँड* ह्या जगप्रसिद्ध कवितेच्या काही वर्षांपूर्वी झालेल्या एका मराठी भाषांतरात याचा प्रत्यय येतो. (पाहा – वैराणभूमी, विश्वास कानडे, *युगवाणी*, मार्च-एप्रिल १९९३). अशा वेळी मूळ साहित्यकृतीतील बोलभाषेसाठी भाषांतरकाराने भिन्नवंशी भाषेतील शिष्टभाषेचीच योजना करणे इष्ट असू शकते.

कोणत्याही श्रेष्ठ कलाकृतीत – तसेच उत्कृष्ट कवितेतदेखील – असणारी आशयगहनता ही त्या कृतीस उत्कृष्टता प्रदान करते. भाषांतरात ही आशयगहनता कायम ठेवणे आवश्यक आहे. अर्थात, आशयगहनता ही संकल्पना सापेक्ष आहे. एखाद्या दृश्यात समोरील भागावर दिसणाऱ्या वस्तूंच्या आकारांमागे अन्य वेगवेगळ्या गोष्टींच्या आकारांची सूचक दाटी असते. भाषांतरकाराने बाह्यस्तरांवर दिसणाऱ्या रूपामागे दडलेल्या अनेक आभासमय आकारांचे स्पष्टीकरण करण्याचे स्वातंत्र्य घेऊन ती साहित्यकृती स्पष्ट करण्याचा मोह टाळणे आवश्यक वाटते. कारण मागे दडलेल्या आभासांमधील बहुसूचकता हीच त्या साहित्यकृतीला आशयगहनता प्राप्त करून देत असते. भाषांतरकाराने भाषांतरित कृतीत मूळ साहित्यकृतीतले सारे आभासनिर्देश जपायला हवेत. "*...depth is fatally condemned to become surface if it wants to be visible.*"[११] हे ओर्तेगाचे विधान फार अर्थपूर्ण आहे. घरात राहणारी व्यक्ती घरी नसतानाही तिचे वास्तव्य घरांतील चीजवस्तूंद्वारे, मांडणीद्वारे जाणवते, तसेच भाषांतरित कृतीतही मूळ कवीच्या वास्तव्याचा वास टिकवता आला पाहिजे. क्वचित मूळ कवितेतील काही स्थळांवर भाषांतराचे सर्व मार्ग खुंटतात. उदा० दिलीप पुरुषोत्तम चित्रे ह्यांच्या –

> *बुलंद आवाजांचे तेज: पुंज ऋषि*
> *मध्यमात मावळणारा त्यांचा मालकंस*
> *शाळुंकेवर उगवणार होती बेभान पिंडी*
> *कागदावर फुटताना पोटफोडी शाई...*[१२]

*किंवा भालचंद्र नेमाडे ह्यांच्या*

> *कशा रांगोळ्या काढता तुम्ही, घरंदाज व्यथांनो*
> *कसा सडा घालता माझ्या अंगणाचा कोपरा कोपरा खुलेल असा,*
> *कशी सजवता तुळशीवृंदावनाची दर्शनी बाजू,*
> *खुडता मंजिऱ्या दुपारच्या सुकलेल्या मऊ नखांनी,*
> *रोज नव्या हातावर केलेल्या कापसाच्या वातींनी लावता*
> *माझ्या पाताळघरातला अंधार प्राथणारी*
> *देवघरातील आंदणाची उभी समई...*[१३]

ह्या ओळींमधील *मध्यम, शाळुंका, पिंडी, रांगोळ्या, घरंदाज, सडा, तुळशीवृंदावन, आंदणाची समई* ह्या शब्दांना इंग्रजी-सारख्या भिन्नकुलीन भाषेत कसे भाषांतरित करायचे? अशा स्थळांवर भाषांतरकाराला लक्ष्यभाषेच्या मर्यादा व मूळ कवितेच्या भाषिक संस्कृतीच्या खास गुणांच्या स्वायत्ततेचा प्रांत स्पष्ट होतो. इथे

भाषांतराचा पराभव झालेला असला तरी भाषांतरकाराला मात्र लाभच झालेला असतो. मूळ कवितेच्या भाषिक संस्कृतीतील खास गुणांची स्वायत्तता नांदत असलेल्या मिणमिणत्या, गूढ प्रांताकडे भाषांतरित कृतीद्वारे वाचकांना नेण्यात आलेल्या अपयशापेक्षाही त्या प्रांताचे गूढ अस्तित्वक्षेत्र आपल्याला सापडले ह्याचा भाषांतरकाराला होणारा आनंद मोठा ठरतो: एखाद्या कवितेच्या आस्वादातील हा आनंद अंतिम असतो.

लेखक वा कवी हा त्याची मूळ संस्कृती, धर्म, श्रद्धा, भौगोलिक परिसर, इतिहास, भाषिक संस्कृती, लोककला अशा अनेक घटकांचा मेळ असलेल्या पर्यावरणाचे अपत्य असतो. हे पर्यावरण लेखकाच्या सर्जनशीलतेचे एक प्राणभूत अंग असते. कवीचे वा लेखकाचे ह्या पर्यावरणाशी असणाऱ्या भावनिक नात्याचे आकलन भाषांतरमीमांसेत विलक्षण महत्त्वाचे असल्यामुळे मानववंशशास्त्र, मानसशास्त्र, तौलनिक साहित्याभ्यासशास्त्र ह्यांचा समावेश भाषांतरमीमांसेत अपरिहार्य ठरतो. भाषांतर मीमांसेने निव्वळ भाषाशास्त्रीय चिकित्सेतून बाहेर निघणे आवश्यक आहे.

उत्कृष्ट कविता ही कवीच्या मानसिकतेतील स्वत:चे साम्राज्य असलेल्या निर्जनात कवीने जीवनाशी निकराने केलेल्या एकाकी युद्धाचा उच्चार असते. स्वत:चे अस्तित्व, स्वत:चे व्यक्तिविशेष विसर्जित करून भाषांतरकाराला ह्या निर्जनात नि:शब्द उतरता आले तर मूळ कवितेतील ह्या निकराच्या युद्धाचे सूक्ष्म पडसाददेखील भाषांतरित कृतीत येऊ शकतात. भाषांतरकार हा मूळ भाषिककृतीतील जगाचा आणि भाषांतररित कृतीतील अवकाशाचादेखील केवळ स्थलांतरित नागरिक असतो. सर्जनातील अनिर्बंध स्वातंत्र्याचे फारसे अधिकार त्याला गृहित धरता येत नाहीत. म्हणूनच त्याची जोखीम ही मूळ कवीपेक्षाही एका विचित्र अर्थाने अधिक मोठी असते.

प्रत्येक भाषा ही तिच्या भाषक-समूहाला एकसंध ठेवते आणि त्या समूहाच्या अभिव्यक्तीला व पर्यायाने त्या समूहाच्या वाङ्मयीन संस्कृतीलाही समृद्ध करीत असते. त्याच वेळी ती अन्य भाषांच्या भाषक-समूहांना परस्परांपासून विलगही करीत असते. भाषेच्या ह्या विभाजनशक्तीमुळे जगातील विविध संस्कृती व समुदाय एकमेकांपासून दूर जातात. भाषेच्या ह्या विध्वंसक वैफल्यावर भाषेच्याच आधाराने मात करून विविध वाङ्मयीन संस्कृतींमध्ये समन्वय (de-alienation) साध्य करण्याचे भाषांतर हेच एकमेव साधन आहे.

(मुंबई विद्यापीठातील गुरुदेव टागोर अध्यासनाच्या तौलनिक साहित्याभ्यास विभागात झालेल्या राष्ट्रीय चर्चासत्रात वाचलेला *विविध वाङ्मयीन संस्कृतींच्या*

*समन्वयामध्ये भाषांतराचे स्थान* हा माझा शोध निबंध व त्यानंतर केलेल्या भाषणांमधील संकल्पनांचा विस्तार प्रस्तुत लेखामध्ये केला आहे.)

**संदर्भ -**


१ Steiner, George. *After Babel*, Oxford Uni. Press, London, 1976, p. 73

२. ग्रेस. *संध्याकाळच्या कविता*, मुंबई, पॉप्युलर प्रकाशन, १९७२

३. ग्रेस. *संध्याकाळच्या कविता*, मुंबई, पॉप्युलर प्रकाशन, १९७२

४. ग्रेस. *संध्याकाळच्या कविता*, मुंबई, पॉप्युलर प्रकाशन, १९७२

५. वामनपंडित. *भीष्मप्रतिज्ञापूर्ती*

६. *Medieval Indian Literature (An Anthology)* Vol. 3
Chief Editor - Ayyapa Paniker

७. Ibid

८. Ibid (ह्यातील ओळींचे प्रस्तुत लेखात सुधारित भाषांतर)

९. एझिकिएल निस्सीम. *लॅटर- डे साम्स्*, मुंबई

१०. देशपांडे, प्रदीप गोपाळ, *काझी सलीम ह्यांची कविता*, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे १९८९

११. Jose Ortega Y Gasset. *Meditations on Quixote*. New York/ London. W.W. Norton and Company, 1963.

१२. चित्रे दिलीप पुरुषोत्तम. *स्मरणपत्र*, *कवितेनंतरच्या कविता*, औरंगाबाद, वाचा प्रकाशन, १९७८

१३. नेमाडे भालचंद्र. *देखणी*, मुंबई, पॉप्युलर प्रकाशन, १९९१


## परिषदवार्ता

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने गेल्या ३ वर्षांपासून प्रतिवर्षी दि. २७ फेब्रुवारी या मराठी भाषा दिनी सत्त्वशीला सामंत स्मृती व्याख्यानाचे आयोजन केले जाते. यावर्षी फर्ग्युसन महाविद्यालयाच्या मराठी विभागाच्या सहकार्याने; रविवार, दि. २८ फेब्रुवारी, २०१६ रोजी संध्याकाळी ६ वाजता भाषा अभ्यासक डॉ. श्री. विवेक भट, मुंबई यांचे व्याख्यान आयोजित केले होते. व्याख्यानाचा विषय होता - भाषाविज्ञानाच्या प्राचीन भारतीय आणि आधुनिक पाश्चिमात्य परंपरा : ध्वनिविचार तसेच पदविचार ह्यांची तुलना.

आपल्या सादरीकरणात त्यांनी दोन्ही परंपरांचा साक्षेपाने विचार केला आणि आपली मते मांडली. लेखरूपाने या व्याख्यानाचा समावेश या अंकात केलेला आहेच.

आनन्द काटीकर






अनुक्रमणिका

# साक्री तालुक्यातील अहिराणी बोलीतील स्त्री विषयक विशेषण

प्रा. डॉ. सौ. योगिता आशुतोष पाटील

आज जागतिकीकरणाच्या युगात बाजाराला महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले आहे. आर्थिक, सामाजिक, राजकीय क्षेत्रांमध्ये स्थित्यंतराची स्वाभाविकता असली तरी भाषिक क्षेत्र विशेषत: बोलीभाषेच्या बाबतीत व्यक्तिबोली संपर्क / समूहबोली संपर्क अजूनही ग्रामीण भागात टिकून असलेला दिसतो. खानदेशातील धुळे जिल्ह्यातील साक्री तालुक्यात 'अहिराणी' ही बोली बोलली जाते. व्यक्ती – व्यक्तींच्या संदेशनात म्हणी, वाक्प्रचार, विशेषणं, प्रतिमा, प्रतिकं ह्यांचा वैपुल्याने पण चपखलतेने वापर होताना दिसून येतो. प्रसारमाध्यमं, भौतिक सुख- सुविधांच्या गदारोळात ग्रामीण क्षेत्रात 'बोली' स्वरूपातील सर्व वैशिष्ट्य आजतरी कायम असलेली दिसतात.

साक्री तालुक्यातील खेडी, भाडणे, म्हस्दी, देवूर, मालपूर, कासारे, नवडणे, महीर, शेवाळी, धमनार, छडवेल पखरूण, धाडणे, दहिवेल इ. ह्या खेड्यातील 'अहिराणी' बोलीभाषेच्या भाषालघुत्व व भाषिक क्लृप्त्यांचा अभ्यास केला असता अहिराणी बोली बोलणाऱ्या समुहाची, व्यक्तीची सुक्ष्म निरिक्षणशक्ती, भाषावृद्धी व हजरजबाबी वृत्ती ह्या ठळक वैशिष्ट्यांचा प्रत्यय येतो. कमीत कमी शब्दात एखाद्या व्यक्तिमत्वाबद्दलची अभिव्यक्ती अहिराणी बोलीत विशेषणाच्या स्वरूपात आढळते. अर्थात ही विशेषणं अनुभव व वर्तनाच्या बाबतीत दिलेली शाब्दिक प्रतिक्रिया असते. त्यामागे पूर्वग्रहदूषितता अपवादाने आढळते. तसेच काही विशेषण लिंगनिहाय तर आहेतच पण काही विशेषणं स्त्री-पुरुष दोहोंसाठी वापरली जातात. काही फक्त लहान मुलांसाठी (बेडुर, बाहोड आतखुन्या, फिंद्री, फिंद्रा, बुचका, खेंचडा, खेंचडी, आंजावना, आंजावनी) वापरली जातात. सहजपणे संदेशनात येणारी ही विशेषणं संदर्भानुसार बदलतात. व्यक्तीचा दर्जा, प्रतिष्ठा, वय, लिंग,विषय, काळ, परिस्थिती यानूसार विशेषणांचा वापर होतो. समोरच्या व्यक्तीसाठी कोणते विशेषण वापरले जाईल हे बोलणाऱ्याच्या आकलन, निरिक्षण, अनुभव, व भाषिकवृद्धीवर अवलंबून असते. विशेषत: व्यक्तीच्या स्वभाव, वर्तन, विचार निहाय मुख्यत्वे विशेषण वापरात असलेली दिसतात.

पुढील काही विशेषणांतून स्त्रियांच्या व्यक्तिमत्वातील काही घटकांविषयी त्या-त्या समूहात मिळालेली मान्यता अधोरेखित होते. पूर्वग्रहदूषितता हा अवगुणही यामागे प्रामुख्याने स्त्री – विशेषणांच्याबाबतीत ठळकपणे दिसून येतो. बोलणाऱ्याच्या

मुखातून निघणाऱ्या विशेषणयुक्त भाषिक विस्ताराचा अभ्यास केल्यास समूहात अशा वैचारिक खोलीबरोबर सुक्ष्म निरिक्षण व अवलोकनक्षमता असलेल्या व्यक्ती मोठ्या प्रमाणात विशेषणांचा वापर करतांना दिसतात. साक्री तालुक्यात शिक्षणाचा प्रचार व प्रसार चांगला झालेला असल्यामुळे, प्रमाण मराठीचा परिचय होऊन ती व्यवहारात वापरातही आहे. पण समुहाची भाषा म्हणून अजूनही 'बोलीभाषा' अहिराणीचाच वापर प्रचलित आहे. स्त्रियांसाठी वापरली जाणारी विशेषण वर्गीकरणानूसार अभ्यासली असता शब्दांची व अर्थांची विपुलता तर आढळतेच पण कमीतकमी शब्दांत अचूक वर्णन हे वैशिष्ट्यही अधोरेखित होते.

**विचार करण्याच्या पद्धतीनूसार :**

मेंगली – एखाद्या गोष्टीविषयी माहित असूनही, काहीच माहित नाही असा अविर्भाव असणारी स्त्री.

पउमथ्थी – भोळेपणाचा आव आणणारी

मतलबी – स्वार्थापूरताच संबंध ठेवणारी

शाक्टी – चतूर

कावावाली – लबाड, धुर्त, चाणाक्ष

धुनी – घातकी, विश्वासघातकी,

चिकनी / चोमडी – स्वत:चं नुकसान न होवू देणारी, गोड बोलणारी.

कडी बत्ताल, चाठ्ठ्य, चुगलबटोरी – लांडी-लबाडी करणारी, लावालावी करणारी, टोपी घालणारी.

**स्वभावविशेषानुसार :**

हुल्लाफुकी, ढमनगारा ढोलकीनं चाउं, धुडकी – कोणतीही गोष्ट गंभीरपणे न घेणारी. गांभीर्याने बोलावं, वागावं, विचार करावा हे माहित नसलेली. खिजगणतीत नसलेली.

उचलचोखंडी, चोनकी, ढलपी, दफडी, फोत्रट – स्वत: विचार न करता दुसऱ्याच अर्धवट ऐकून आपली मतं पक्की करून वागणारी.

दावली, वचकादेव्हारा, वाली, बिनबुननं भांडं – बालीशपणे वागणारी

खुतपसंद, येंगरट, मनचव्वी ज्यागीरदारीन – स्वत:च्या मनाप्रमाणेच वागणारी

पट्ट्यारी – अपमानाची पर्वा नसलेली, हट्टी स्वभावाची. परिणामांची पर्वा न करणारी.

खारबयी – दुसऱ्याचा द्वेष करणारी

कडीजखडीनी – अभिनिवेषाने वागणारी

वर्तनविशेषानुसार :

पोटगवयी, हापापेल, ढाढरगी, फाफलायेल, नितातेल – कोणतीही गोष्ट (वस्तू, अन्न) आधी आपल्यालाच मिळायला हवी हा हव्यास असलेली.

बिनलाजनी शिंडाय, वड्डाय – अनैतिकतेने वागणारी

परायधार्जिनी – घरच्यांपेक्षा बाहेरच्यांनाच उपयोगी पडणारी

उंडय, येडीमथ्थीनी, वाया व्हयेल – सरळ गोष्टीला उलट अर्थाने आत्मसात करणारी, उथळपणे तेच ते बोलणारी.

उधयमानकी, खरोटी – सत्वे नसलेली, हाताशी काहीच ठरवून न ठेवणारी

रग्गेल, चढेल, मखडायेल – अहंकाराने, शिष्टपणाने वागणारी

रिझोली, गमरी – कामात मंदगती असलेली

आलनीमचक, निचगळ – अंगात ताकद नसलेली, व्यक्तिमत्वात, कामात भारदस्तपणा नसलेली.

गांजोली – दुसऱ्याना फक्त त्रास होईल असे वागणारी,

धावज्या, दाद्या, नयाडीना दांड – पुरुषाप्रमाणे आडदांड वागणारी

खमकी, मगरमस, खरमस – सशक्त, निर्भयपणे वागणारी

जानाजोशीनी जातनी – मनकवडी, दूरदृष्टीकोन असलेली





अनुक्रमणिका

**बोलण्याच्या शैलीनुसार / वापरानुसार :**

टमराघो, चबरी – सतत बोलणारी

जल्लाद, आगुनगारी – क्लेशकारक शब्द वापरणारी

वावधन, डाच्याय, कजायकत्री – सतत भांडणासाठी तत्पर असलेली

मुंगशी – अन्यायाविरुद्धही आवाज न उठवणारी / मितभाषी

लभरी – न विचारताही सल्ला देणारी, स्वत:हून गरज नसतांना संवादात आपला सहभाग नोंदविणारी

उघडातोंडनी – लहान मोठ्याची पायरी न ठेवता बोलणारी, फटकळ

**समाजात वावरतांना येणाऱ्या संपर्कानुसार / व्यवहारानुसार :**

एखलखुरी – समुहात न मिसळणारी

खस – समाजासाठी कोणताही त्याग न करणारी (शरीर, पैसा, वस्तू)

कोपरी – समूहात सामील न होणारी, मिरवायला न आवडणारी

टकारीन, गुरीन, वैरीन, भटकभवानी, टपालपेटी – सतत फिरणारी

लिवूपासरी – दुसऱ्यांकडूनच अपेक्षा करणारी, मिळण्याची वाट पहाणारी

**राहणीमान व शारीरिक ठेवणीनुसार :**

गोबरी, दलिंदर, घनायेल – स्वत:च्या राहणीमानाविषयी, नीटनेटकेपणाविषयी दक्ष नसलेली. गबाळे व्यक्तिमत्त्वाची.

चन्नामोगरी, चायावाली – राहणीमानाबाबत जास्तीची दक्ष असलेली

नक्टी, बाबरव्हटी, चकनी – लहान नाक, जाड ओठ, तिरके डोळे असलेली

भुईदैडी – कमी उंचीची

टेंपी – वयस्कर मुलगी

भूरीपाल – गोऱ्या रंगाची पण कपटी मनाची

दम्मामूरयी – भारदस्त व्यक्तिमत्वाची स्त्री





अनुक्रमणिका

**वस्तु व प्राण्यांच्या गुणधर्मानुसार :**

शेलाटी – चपळ, सुरती बकरी – सतत खाणारी,

बांडी घार – खोटं बोलणारी, घुनी मांजर – धूर्त स्त्री,

म्हैस – मंदगती असलेली, सांडा – कामाशिवाय फिरत रहाणारी,

घूस – इतरांच्या घरी जायला / राहायला आवड असणारी,

घोडी – चंचल स्वभावाची, वापसायेल वांग – त्राण नसलेली

वस्तु – लाटनी, कुस्सा, फुकनी, रंग्यानी कुऱ्हाड, नयाडीना दांड, दफडी, चिकना फद्या,

ह्या व्यतिरिक्त ग्रामीण भागातील (साक्री तालुका) अंधश्रद्धेच्यापायी – भोरीब्रोटी, पांढरापायनी, कपायकरंटी, दुव्वाड, कायजीभी, कैदासीन, उगरीन, चानचुडेल, यासारख्या विशेषणांचा वापर होतांना दिसतो. तर अश्लील शब्दांचा अतिरेकी वापर शिव्यांमध्ये होतो. विशेषत: बारबोडी, सव्वाडी, झयेल, बारास्नी बायको, रांड, सुनासांड, खुटावरनी गाय, दादलयडी, भंग्यानी बायको...यासारख्या शब्दांचा, विशेषणांचे संदेशनात होणारे उपयोजन व व्यवहार, निकोप अहिराणी भाषक समाजाच्या वृद्धीसाठी, पुढील पिढीच्या मूल्यसंस्काराच्या दृष्टीने निश्चितच हितावह नाहीत.

**पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे असते :**

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे इत्यादी.

# भाषाविज्ञानाच्या प्राचीन भारतीय आणि आधुनिक पाश्चिमात्य परंपरा ध्वनिविचार तसेच पदविचार ह्यांची तुलना

विवेक भट

मी संस्कृत आणि भाषाशास्त्र अशा दोन्ही भाषाशाखांचा अभ्यासक आहे, मात्र मी त्यांतील तज्ज्ञ आहे असा माझा दावा नाही. भारतामध्ये प्राचीनकाळापासून भाषाशास्त्राची मोठी परंपरा होती. याउलट पाश्चिमात्य देशांमध्ये प्राचीनकाळांत ग्रीकांकडे असलेली ह्या शास्त्राची परंपरा मध्ययुगामध्ये कित्येक शतके खंडित झाली होती. सुमारे सतराव्या शतकापासून आणि विशेषत: सस्यूरपासून तिची खूप जोमाने वाढ झाली आहे. ह्या दोन परंपरांची ध्वनिविचार व पदविचार ह्या दोन अंगांनी तुलना करण्याचा मी प्रयत्न करतो तेव्हां मला काही प्रश्न पडतात. ते प्रश्न मी आपल्यापुढे मांडतो आहे म्हणजे त्या दृष्टीने हे एक मुक्त चिंतन आहे आणि त्यापैकी काही प्रश्नांची उत्तरे आपल्याकडून मिळाली तर मला अतिशय आनंद होणार आहे.

मानवी मौखिक ध्वनी हा भाषेचा लघुतम घटक म्हणून त्यापासून भाषाभ्यासाची सुरुवात होते.

## ध्वनिविचार (phonetics)

ध्वनींचे दोन प्रमुख भाग म्हणजे स्वर आणि व्यंजन. त्यापैकी स्वराची सुस्पष्ट व्याख्या प्राचीन परंपरेत केलेली आहे आणि ती साधारणपणे आधुनिक व्याख्येप्रमाणेच आहे. त्यात अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, दीर्घ ऋ, लृ, ए, ऐ, ओ, औ असे स्वर सांगितले आहेत. शिवाय उदात्त, अनुदात्त, स्वरित (वास्तविक स्वराघात) ह्यांनाही स्वर अशी संज्ञा आहे. आधुनिक भाषाभ्यासामध्ये स्वराघाताची संकल्पना थोडी वेगळी आहे – त्याला pitch accent किंवा tone असे म्हणतात आणि त्यावरून toneme असा एक नवीन ध्वनिविचारही मांडला गेला आहे.

स्वराची आधुनिक व्याख्या थोडी अधिक विस्ताराने केली गेली आहे ती म्हणजे स्वराचा उच्चार करताना वायूला श्वसनमार्गांत कोणताही अडथळा होत नाही आणि स्वर कितीही लांबविता येतो, तसेच सर्व स्वर घोष असतात. (ऐ आणि औ हे स्वर वैयक्तिकपणे लांबवता येत नाहीत, त्यांना संयुक्त स्वर असे म्हणता येईल. त्यांची व्यवस्था आधुनिक भाषाशास्त्राने vocalic sequence किंवा diphthong अशा प्रकारे थोडी वेगळी लावली आहे पण त्याची चर्चा येथे विस्तारभयास्तव करीत नाही). व्यंजनांची व्याख्या म्हणजे स्वराच्या व्याख्येच्या अगदी उलट. व्यंजने घोष किंवा अघोष

असू शकतात. आपल्या प्राचीन पाणिनीय परंपरेने स्वर आणि व्यंजने अशा सर्व ध्वनींचे उच्चारानुसार एकत्रच वर्गीकरण केले आहे ते म्हणजे

- आघात (उदात्त, अनुदात्त, स्वरित – त्यांना वास्तविक स्वराघात म्हणायला हवे),
- काल (ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत),
- स्थान (हृदय, कण्ठ, शीर्ष, जिह्वामूल, दन्त, नासिका, ओष्ठ, तालु),
- प्रयत्न (आभ्यन्तर, बाह्य) असे आहे.

त्याविषयी भट्टोजी दीक्षीतांनी खालील प्रकारचे नियम दिले आहेत –

१. अकुहविसर्जनीयानां कण्ठः, २. इचुयशानां तालु, ३. ऋटुरषाणां मूर्धा,

४. लृतुलसानां दन्ताः, ५. उपूपध्मानीयानां ओष्ठौ,

६. ञमङणनानां नासिका च, ७. एदैतोः कण्ठतालु, ८.ओदौतोः कण्ठोष्ठम्,

९. वकारस्य दन्तोष्ठम्, १०. जिह्वामूलीयस्य जिह्वामूलम्,

११. नासिका अनुस्वारस्य।

आधुनिक भाषाभ्यासामध्ये मात्र स्वरांचे आणि व्यंजनांचे वर्गीकरण स्वतंत्रपणे केले गेले आहे, आणि ते खालील तक्त्यांमध्ये दाखवले जाते.

THE INTERNATIONAL PHONETIC ALPHABET (revised to 2005)

CONSONANTS (PULMONIC) © 2005 IPA

| | Bilabial | Labiodental | Dental | Alveolar | Postalveolar | Retroflex | Palatal | Velar | Uvular | Pharyngeal | Glottal |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| Plosive | p b | | | t d | | ʈ ɖ | c ɟ | k ɡ | q ɢ | | ʔ |
| Nasal | m | ɱ | | n | | ɳ | ɲ | ŋ | ɴ | | |
| Trill | ʙ | | | r | | | | | ʀ | | |
| Tap or Flap | | ⱱ | | ɾ | | ɽ | | | | | |
| Fricative | ɸ β | f v | θ ð | s z | ʃ ʒ | ʂ ʐ | ç ʝ | x ɣ | χ ʁ | ħ ʕ | h ɦ |
| Lateral fricative | | | | ɬ ɮ | | | | | | | |
| Approximant | | ʋ | | ɹ | | ɻ | j | ɰ | | | |
| Lateral approximant | | | | l | | ɭ | ʎ | ʟ | | | |

Where symbols appear in pairs, the one to the right represents a voiced consonant. Shaded areas denote articulations judged impossible.

VOWELS

Front Central Back

Close i • y — ɨ • ʉ — ɯ • u

I Y ʊ

Close-mid e • ø — ɘ • ɵ — ɤ • o

ə

Open-mid ɛ • œ — ɜ • ɞ — ʌ • ɔ

æ ɐ

Open a • ɶ — ɑ • ɒ

Where symbols appear in pairs, the one to the right represents a rounded vowel

ह्या दोन प्रकारच्या तक्त्यांची तुलना करताना असे लक्षात येते की प्राचीन भारतीय परंपरेला मुळातच उच्चारानुसारी असणाऱ्या नागरी लिपीचा आधार आहे तर आधुनिक पाश्चिमात्य परंपरेला त्यासाठी International Phonetic Alphabet (IPA) ह्या उच्चारानुसारी लिपीची प्रयत्नपूर्वक निर्मिती करावी लागली आहे. आधुनिक परंपरा थोडा अधिक विस्ताराने स्वरांचा विचार करतेवेळी असे सांगते की स्वरांचे उच्चारण हे जिभेची उंची (वर किंवा खाली), स्थिती (पुढे किंवा मागे) आणि ओठांचे चंबूकरण यांवर अवलंबून असते. तर भारतीय परंपरा 'एदैतो: कण्ठतालु' म्हणताना 'ए' आणि 'ऐ'च्या बाबतीत कण्ठ हे उच्चारण स्थान तसेच जिभेची उंची सांगते, जिभेची स्थिती मात्र सांगत नाही. तसेच 'ओदौतो: कण्ठोष्ठम्' याने 'ओ' आणि 'औ' मध्ये कण्ठ आणि ओष्ठ हे उच्चारण स्थान सांगते, परंतु जिभेची उंची आणि स्थिती सांगत नाही. अर्थात येथे ओठांचे चंबूकरण सांगितले नसले तरी 'ओ' ह्या उच्चारामध्ये ते गृहीत आहे.

व्यंजनांकडे पाहताना असे दिसते की भारतीय परंपरेत व्यंजनांची मोजणी कण्ठ्य व्यंजनापासून (क, ख वगैरे) सुरू होते तर आधुनिक परंपरेत ती ओष्ठ्य व्यंजनांपासून (प, फ वगैरे) सुरू होते. ह्यांत तसा काही फरक पडत नसला तरी ओष्ठ्य व्यंजनांचे उच्चारण सोपे असते आणि लहान मुले बोलायला शिकताना ओष्ठ्य व्यंजनांपासूनच सुरुवात करतात याची नोंद घेण्यासारखी आहे. व्यंजनांचे उच्चारण हे स्थान, पद्धती आणि glottisची अवस्था ह्यांवर अवलंबून असते असे आधुनिक परंपरा सांगते. भारतीय परंपरेत यापैकी स्थानाची नोंद भट्टोजी दीक्षितांनी त्यांच्या सूत्रांमधून घेतली आहे; पद्धतीविषयी प्रयत्न सांगतात, आणि glottisची अवस्था याचे विवरण घोष/अघोष ह्या संकल्पनेतून येते. येथे स्थानांविषयी सांगताना भारतीय परंपरेचा एक विशेष





अनुक्रमणिका

उल्लेख करण्यासारखा आहे की वर्णमालेमध्ये 'कु, चु, टु, तु, पु' हे व्यंजनांचे वर्ग दाखवताना त्यांतील वर्णांची रचना अघोष अल्पप्राण, अघोष महाप्राण, घोष अल्पप्राण, घोष महाप्राण, आणि अनुनासिक अशी मोठ्या शास्त्रशुद्ध पद्धतीने केलेली आहे. आधुनिक परंपरेमध्ये अशी रचना कोठेही केलेली दिसत नाही.

'ञमङणनानां नासिका च' मधील 'च' महत्त्वाचा आहे कारण अनुनासिके हीसुद्धा स्पर्श वर्णच आहेत, फक्त त्यांच्या उच्चारणामध्ये वायू मुखविवराबरोबरच नासिकेमधूनही बाहेर पडत असतो हा मुद्दा त्यामधून कळतो. आधुनिक परंपरेने दाखवलेले दन्तोष्ठ्य अनुनासिक [M] हे अनुनासिक मात्र भारतीय परंपरेने का दाखवले नाही ते लक्षात येत नाही. वास्तविक त्याचा उच्चार संवाद, संहिता, संलग्न ह्यांसारख्या शब्दांमध्ये होतोच ना?

भारतीय परंपरेने व्यंजनाची यादी करताना त्यांत 'ळ' ह्या ध्वनीचा समावेश केलेला नाही हे एक आश्चर्य म्हणावे लागेल. संस्कृतमध्ये 'ळ' हा दुर्मिळ आहे हे खरे असले तरी तो ध्वनी तेथे आहे (ऋग्वेदाच्या पहिल्या ऋचेतच तो आहे) हे नाकारता येणार नाही. फार काटेकोरपणे पाहायचे झाले तरी निदान 'ड' ह्या ध्वनीचा allophone म्हणून तरी त्याची नोंद घेणे आवश्यक होते.

भारतीय परंपरेने स्पर्श व्यंजनांचा विचार प्रामुख्याने केलेला आहे कारण संस्कृतमध्ये (आणि अर्वाचीन संस्कृतोद्भव भाषांमध्येदेखील) स्पर्श व्यंजने अधिक आहेत आणि घर्ष व्यंजने थोडी आहेत. शिवाय संस्कृतव्यतिरिक्त ज्ञात/अज्ञात सर्व भाषांमधील ध्वनींची नोंद घेणे हे भारतीय परंपरेचे उद्दिष्ट नसावे. याउलट युरोपीय भाषांमध्ये घर्ष व्यंजने अधिक आहेत तसेच आधुनिक परंपरेचे लक्ष्य हे जगांतील सर्व भाषांचा विचार करणे हे आहे. त्यामुळे त्यांच्या व्यंजनतक्त्यामध्ये स्पर्श आणि घर्ष अशा दोन्ही प्रकारच्या व्यंजनांचा एक प्रकारचा समतोल आढळतो. ह्याहीपुढे जाऊन काही स्वर वा व्यंजने अद्यापि कोणत्याही भाषेत आढळली नसली आणि ती तत्त्वतः संभव असली तर तीही दाखवण्याचा प्रयत्न त्यांच्या तक्त्यांमध्ये केलेला आहे.

मला पडलेले दोन प्रश्न 'उपध्मानीय' आणि 'जिह्वामूलीय' ध्वनींविषयी आहेत. हे ध्वनी नक्की कोणते याविषयी काही स्पष्टीकरण मिळत नाही. परंपरेने अभ्यासकांना असे सांगितले जाते की विसर्गानंतर येणारे 'प' आणि 'फ' हे ध्वनी उपध्मानीय आहेत, परंतु 'ओष्ठौ' म्हटल्याने त्यांचे 'स्थान' कळले तरी 'प्रयत्न' कळत नाही. हे ध्वनी वापरात आहेत अशा शब्दांची निश्चित उदाहरणे सांगितलेली दिसत नाहीत. विसर्गानंतर येणारे 'प' आणि 'फ' हे अघोष ध्वनी उपध्मानीय असतील तर त्याच स्थानी येणारे

'ब' आणि 'भ' हे घोष ध्वनी उपध्मानीय का नाहीत तेही स्पष्ट होत नाही. जिह्वामूलीयांच्या बाबतींत हे ध्वनी कोणते ते सांगितले नाही, मात्र त्यांचे स्थान जिह्वामूल असे सांगितले.

येथे जिह्वामूल म्हणजे जिभेचे मूळ अर्थात जिभेचा मागील भाग, त्यामुळे जिभेच्या मागील भागाचा तालूला स्पर्श होऊन निर्माण होणारे ध्वनी असा अर्थ आहे. तेव्हा ज्यांना आधुनिक परंपरा uvular plosives म्हणते ते [q] आणि [G] हे ध्वनी असावेत. हे ध्वनी फारसी तसेच उर्दू भाषांमध्ये वापरांत आहेत (उदा० क़ातिल, ख़ूबसूरत, ग़ालिब, बाग़बान) परंतु संस्कृतमध्ये नाहीत. आपण स्वतः न ऐकलेले हे ध्वनी कोणत्यातरी भाषेत अस्तित्वात असू शकतील असा अंदाज करून प्राचीन भारतीय भाषाशास्त्रज्ञांनी ते आपल्या सूत्रांत बसविले असा याचा अर्थ घ्यायचा का? म्हणजे मग ते मोठे द्रष्टे होते असे मान्य करायला हवे.

आधुनिक परंपरा ज्या ध्वनींची plosives, fricatives, approximant अशी व्याख्या करते त्यांना आपल्या परंपरेने अनुक्रमे स्पृष्ट, घर्ष, आणि ईषत्स्पृष्ट अशा संज्ञा दिल्या आहेत. तसेच 'य' आणि 'व' ह्यांना दोन्ही परंपरांनी अनुक्रमे semivowel आणि अर्धस्वर अशा समर्पक संज्ञा दिल्या आहेत कारण ते ध्वनी उच्चारणाच्या दृष्टीने स्वर आहेत परंतु ते कार्य व्यंजनासारखे करतात. शिवाय 'य', 'व', 'र', 'ल' ह्या सर्वांना आपल्या परंपरेने 'अंतःस्थ' असेही म्हटले आहे कारण ते ध्वनी स्पृष्ट आणि अस्पृष्ट ह्यांच्या मध्ये आहेत आणि स्वर, व्यंजने ह्यांच्याही मध्ये आहेत. यण् आणि संप्रसारण यामध्ये इ, उ, ऋ, लृ य, व, र, ल अशी अदलाबदल होत असते हे आपणां सर्वांना माहिती आहे.

*[आधुनिक परंपरेने केलेल्या वरील व्याख्यांचे सविस्तर वर्णन असे आहे: plosives = उच्चारणाचे दोन अवयव एकमेकांना स्पर्श करतात, वायूला निमिषमात्र अटकाव करतात आणि नंतर एक प्रकारे स्फोट झाल्यासारखा वायू बाहेर पडतो. Fricatives = उच्चारणाचे दोन अवयव जवळ येतात परंतु एकमेकांना स्पर्श करीत नाहीत, त्यामुळे वायूला खऱ्या अर्थाने अटकाव करीत नाहीत आणि नंतर एक प्रकारे थरकाप झाल्यासारखा वायू बाहेर पडतो. Approximant = उच्चारणाचे दोन अवयव जवळ येतात परंतु fricatives मधल्याइतके जवळ नाहीत, त्यामुळे वायूला अटकाव होतच नाही].

बाह्य प्रयत्नांविषयी आपली परंपरा म्हणते की कण्ठ सोडून, घशाच्या आतील भागातील स्वरयंत्रे (vocal folds), तसेच नासिका (nasal cavity), आणि श्वास

(aspiration) हे कार्यकारी होतात. म्हणून घोष, अनुनासिक, प्राण ही कार्ये होतात. स्पर्श वर्ण घोष किंवा अघोष होऊ शकतात. सगळे स्वर घोषच असतात आणि ते अनुनासिक होऊ शकतात. घर्ष वर्ण श, ष, स, ह हे अनुनासिक होत नाहीत. स्पर्श वर्ण, अंतःस्थ वर्ण आणि म, न, ण ही अनुनासिके महाप्राण होऊ शकतात. [येथे 'होऊ शकतात' अशी शब्दरचना केली आहे ती केवळ शक्यता दर्शविण्यासाठी आहे, तसे भाषिक व्यवहारांत होईलच असे नसते].

आधुनिक परंपरा ह्या कार्यांचे खाली दिल्याप्रमाणे सविस्तर वर्णन करते, तसे वर्णन आपल्या प्राचीन परंपरेत केलेले दिसत नसले तरी ते त्यात अध्याहृत आहे असे म्हणायला काही हरकत नाही. घोष ध्वनी उच्चारताना vocal folds काही विशिष्ट प्रकारे थरथरतात (vibrate), अनुनासिकांच्या उच्चारणाच्या वेळी वायू मुख आणि नासिका अशा दोहोंमधून बाहेर पडतो. श्वासयुक्त ध्वनींच्या उच्चारणाच्या वेळी मूळ ध्वनी उच्चारल्यानंतर लगेच हवेचा एक अधिक झोत (an extra puff of air) बाहेर टाकला जातो वगैरे.

## वर्णविचार (phonology)

सर्व ध्वनी सर्व भाषांमध्ये वापरले जात नाहीत आणि प्रत्येक भाषेत वापरल्या जाणाऱ्या ध्वनींचा अभ्यास स्वतंत्रपणे करावा लागतो. त्यामुळे असा अभ्यास हा भाषासापेक्ष असतो. उदा॰ अॅ, ऑ हे स्वर संस्कृतमध्ये नाहीत आणि संस्कृतोद्भव भाषांमध्येही सामान्यपणे नाहीत, तसेच ह्या भाषांमध्ये 'स्-ट्' हा व्यंजनसमूह (consonant cluster) शब्दाच्या सुरुवातीला येऊ शकत नाही. याउलट घोष महाप्राण व्यंजने आणि जोडध्वनी (geminates) युरोपीय भाषांमध्ये नाहीत, त्यामुळे परकी भाषा शिकताना ह्या गोष्टी प्रयत्नपूर्वक शिकाव्या आणि लक्षात ठेवाव्या लागतात.

वर्णविचार भाषासापेक्ष असल्यामुळे भाषांच्या तुलनेसाठी आधुनिक परंपरेत त्याचा उपयोग केला जातो. भारतीय परंपरेला सामान्यपणे संस्कृत व्यतिरिक्त इतर भाषांचा विचार करावयाचा नसल्यामुळे भाषानिहाय वर्णविचार येथे केलेला नाही. भाषांच्या तुलनात्मक अभ्यासाचा अभाव हा प्राचीन भारतीय परंपरेचा दोष मानण्याकडे कधीकधी पाश्चिमात्य परंपरेचा कल असतो परंतु हा मुद्दा निरर्थक आहे कारण असा अभ्यास पाश्चिमात्य परंपरेनेही अर्वाचीन काळांत दळणवळणाची सुलभता आल्यानंतरच सुरू केला आहे; पूर्वी ग्रीकांनीही असा अभ्यास केलेला दिसत नाही.

आधुनिक परंपरेने भाषाभ्यासात phoneme ही एक महत्त्वपूर्ण संकल्पना मांडली आहे. Phoneme म्हणजे भाषेतील असा लघुतम घटक किंवा ध्वनी की ज्याला

स्वत:चा अर्थ नाही परंतु त्याच्याजागी दुसरा एखादा ध्वनी वापरला तर शब्दाचा अर्थ बदलतो. दोन ध्वनी हे स्वतंत्र phonemes आहेत असे म्हणण्यासाठी किमान एक minimal pair शोधावी लागते. (Minimal pair = a pair of two phones where replacing one by another in a word, keeping the environment same, gives a meaning change). तसेच एखादा ध्वनी हा त्या विशिष्ट भाषेमध्ये phoneme आहे असे ठरल्यानंतर त्याविषयी पुनर्विचार संभवत नाही. उदा० इंग्लिशमध्ये '[p/b]'/' किंवा '[i]/[i:] ही स्वतंत्र phonemes आहेत कारण pin/bin, sit/seat ह्यांमध्ये आधी सांगितल्याप्रमाणे अर्थभेद दिसून येतो. परंतु, [p]/[pH] ह्या ध्वनींच्या बाबतीत इंग्लिशमध्ये तसे होत नाही. शब्दाच्या सुरुवातीस आलेल्या [p] चा उच्चार [pH] असा होतो आणि [pin] ऐवजी [pHin] म्हटल्यास त्यांच्यात अर्थभेद होत नाही. म्हणून [p] आणि [pH] हे इंग्लिश भाषेत स्वतंत्र phoneme नाहीत. मात्र phoneme ही भाषासापेक्ष संकल्पना आहे. संस्कृत आणि संस्कृतोद्भव भाषांमध्ये 'प' आणि 'फ' हे स्वतंत्र phoneme आहेत असे म्हणावे लागते कारण 'पल' आणि 'फल' असे दोन शब्द घेतले तर 'प' च्या जागी 'फ' हा ध्वनी वापरल्याने अर्थबदल होतो. इंग्लिश भाषेत [p] आणि [pH] हे स्थानसापेक्ष उच्चार आहेत आणि एकाच्याऐवजी दुसरा वापरल्याने अर्थभेद होत नाही म्हणून ते इंग्लिश भाषेत phonemes नसून allophones आहेत.

ह्याउलट भारतीय परंपरेची अशी धारणा आहे की दोन ध्वनी जर वेगवेगळ्या प्रकारे उच्चारले जात असतील परंतु त्यांचे उच्चारणस्थान आणि प्रयत्न समान असतील तर तो एकच ध्वनी समजावा (तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्). त्या सर्वांना एकाच प्रकारात समाविष्ट करून तो एकच ध्वनी मानावा आणि इतर सर्व प्रकार त्या ध्वनीचे उपध्वनी मानावेत असा संकेत आहे, परंतु त्यांची सांगड आधुनिक परंपरेतील phoneme व allophone ह्यांच्याशी घालता येत नाही. किंबहुना phoneme अशी काही संकल्पना संस्कृतमध्ये महत्त्वाची मानलेली दिसत नाही कारण सुयोग्य minimal pairs मिळत नाहीत. उदा० (शश्वत्/शाश्वत्, शिर/शीर, प्रतिकार/प्रतीकार, पुरुष/पूरुष, यांचा अर्थ समान आहे पण मिल्/मील्, दिन/दीन, पुर/पूर, उरु/ऊरु यांचा अर्थ समान नाही. कोश आणि कोष यांचा अर्थ समान आहे पण विश् आणि विष् ह्या धातूंचा अर्थ समान नाही. म्हणून अ/आ, इ/ई, उ/ऊ तसेच श/ष हे ध्वनी संस्कृत भाषेत स्वतंत्र phonemes आहेत असे म्हणता येणार नाही.

ध्वनी एकच असून केवळ शब्दातील त्याचे स्थान बदलल्यामुळे उच्चार बदलतो आणि अर्थ तोच राहतो असे भारतीय भाषिक परंपरेमध्ये सहसा होत नाही. परंतु तरीही

असे ध्वनी भारतीय भाषांमध्ये अपवादाने का होईना पण दिसतात. उदा० 'ड' हा ध्वनी शब्दाच्या सुरुवातीला आणि शब्दात अन्यत्र आल्यास त्याचा उच्चार वेगळा होतो, जसे मराठीत 'डमरू' आणि 'कडक'/'कडा' ह्यांसारख्या शब्दांमध्ये दिसते. एवढेच नव्हे तर संस्कृतमध्ये दोन स्वरांच्यामध्ये आलेल्या 'ड' चा उच्चार 'ळ' असा होतो. म्हणजे 'ड' आणि 'ळ' हे ध्वनी संस्कृतमध्ये allophones आहेत असे मान्य करावे लागेल.

शिवाय, वेगवेगळी माणसे किंवा एकच माणूस वेगवेगळ्या वेळेस शब्दातील एकच ध्वनी वेगवेगळ्या प्रकारे उच्चारेल आणि तरीही शब्दाचा अर्थ बदलणार नाही असे इंग्लिश, जर्मन इत्यादि भाषांमध्ये होऊ शकते. इंग्लिशमध्ये 'often', 'economics' किंवा जर्मनमध्ये 'ich' ह्यांसारखे शब्द ही त्याची उदाहरणे आहेत. ह्याला free variation असे म्हणतात. भारतीय परंपरेतील भाषांमध्ये मात्र एकच ध्वनी वेगवेगळ्या प्रकारे उच्चारणे हा मुळात उच्चारणदोष मानला जाईल. अर्थातच free variation हा प्रकार भारतीय परंपरेतील भाषांमध्ये स्वीकारार्ह नाही.

## पदविचार (morphology)

आधुनिक परंपरेने morpheme अशी आणखी एक महत्त्वाची संकल्पना मांडली आहे आणि स्वत:चा काही अर्थ किंवा व्याकरणिक कार्य असणारा भाषेतील लघुतम घटक अशी त्याची व्याख्या केली आहे. त्यामुळे वरील व्याख्येनुसार morpheme म्हणजे एखादा शब्द किंवा शब्दाचा एक भाग असू शकेल. याउलट शब्द म्हणजे एक morpheme असेल किंवा morphemes चा समूह असेल. ह्या आधुनिक संकल्पनेशी थोडीफार जुळणारी 'व्यवसित' ही एक संकल्पना भारतीय परंपरेत आढळते. भाषेतील अर्थवाहक अशा काही वर्णसमूहरूपी घटकांना 'व्यवसित' ही संज्ञा पतंजलिमुनींनी दिली आहे. म्हणून morpheme आणि 'व्यवसित' ह्या दोन संकल्पनांची तुलना करून पाहण्यासारखी आहे.

आधुनिक परंपरेत रुपिम (morpheme) याचे वर्गीकरण मुक्त (free) आणि बद्ध (bound) असे केले जाते. ह्या संकल्पना सर्वांना विदित आहेतच.

- **मुक्त रुपिम** ह्याला स्वतंत्र अस्तित्व असते म्हणजे ते प्रत्ययरहित असा एक स्वतंत्र शब्द असू शकते. त्याला अर्थ असतो किंवा व्याकरणिक कार्य असते.
- **बद्ध रुपिम** हे जरी अर्थपूर्ण असले तरी त्याला भाषेत स्वतंत्रपणे अस्तित्व नसते. जेव्हा ते दुसऱ्या एखाद्या morpheme सह (मग ते दुसरे morpheme मुक्त असेल किंवा बद्ध असेल) बांधलेले असते तेव्हाच त्याचा भाषेत प्रयोग होऊ शकतो.





अनुक्रमणिका

• विस्तारभयास्तव त्यांचे अधिक विवेचन येथे करीत नाही परंतु महत्त्वाचे असे की दोन बद्ध **रुपिम** एकत्र येऊनही शब्द तयार होऊ शकतात, उदा॰ De-tain, re-tain, con-tain, de-ceive, re-ceive, per-ceive, con-ceive, etc.

• येथे हे सांगणे आवश्यक आहे की अशा प्रकारे केवळ दोन प्रत्यय एकत्र आणून अर्थपूर्ण शब्द संस्कृतमध्ये तयार करता येणार नाहीत.

पतंजलिमुनींनी व्यवसिताची व्याख्या स्पष्टपणे दिली नसली तरी ती रुपिम ह्या संकल्पनेशी थोडीफार जुळणारी आहे. मात्र व्यवसितांचे वर्गीकरण त्यांनी अगदी वेगळे आणि सविस्तर केले आहे. ते म्हणतात, "के पुनर्व्यवसिता:?" "धातु – प्रत्यय – प्रातिपदिक – आगम – आदेश – निपाता:।।"

म्हणजे त्यांची ही व्याख्या आधुनिक रुपिमाच्या संकल्पनेहून काही अंशी वेगळी ठरते. त्यांचा भर 'अर्थवत्' ह्यांवर अधिक असावा.

**धातु व्यवसित -** हे क्रिया दाखवते किंवा क्रियेचा अर्थ सांगते. धातुव्यवसिते सिद्ध आणि साधित अशी मिळून अनंत आहेत.

**प्रत्यय व्यवसित** – सर्व प्रकारचे प्रत्यय हे व्यवसित आहेत. त्यातील काही प्रत्यय अवसानीय (closing morphemes) आहेत आणि काही अनवसानीय (non-closing morphemes) आहेत.

• सुप् आणि तिङ् प्रत्यय अवसानीय आहेत. सुप् प्रत्यय प्रातिपदिकानंतर लागतात, तिङ् प्रत्यय धातूनंतर लागतात.

• अनवसानीय प्रत्ययांपैकी तद्धित, स्त्रीप्रत्यय आणि नामधातु हे प्रातिपदिकानंतर लागतात, तर कृदन्त, प्रयोजक, कर्मणि, इच्छार्थक, आणि पौन:पुन्यार्थक प्रत्यय धातूनंतर लागतात.

• अर्थातच अनवसानीय प्रत्ययांनंतर अवसानीय प्रत्यय लावता येतात, परंतु अवसानीय प्रत्ययांनंतर कोणताही प्रत्यय पुढे लावता येत नाही.

**निपात व्यवसित** – बहुतेक निपातांना अर्थ आहेत (मग सर्व व्यवसिते सार्थ असायलाच हवीत असे म्हणता येईल काय?)

**आदेश व्यवसित** – अशी व्यवसिते धातु, प्रातिपदिक आणि प्रत्यय अशा तिन्ही व्यवसितांनंतर लावता येतात, त्यांना धात्वादेश, प्रातिपदिकादेश, आणि प्रत्ययादेश असे म्हणतात.





अनुक्रमणिका

प्रातिपदिक व्यवसित – व्यवसितांची morpheme ह्या संकल्पनेशी सांगड घालण्यात खरी समस्या येथे आहे. प्रातिपदिके अनंत आहेत. पाणिनिमुनी त्यांची व्याख्या अशी करतात – "अर्थवत् अधातुः अप्रत्ययः प्रातिपदिकम्।। येथपर्यंत ठीक आहे, परंतु ते पुढे म्हणतात – कृत् तद्धित समासाश्च।।"

- कृत् प्रत्यय, तद्धित प्रत्यय, आणि समासांना व्यवसित म्हटले तरी morpheme म्हणता येणार नाही कारण कृत् आणि तद्धित प्रत्यय ही स्वत:च वेगळी morphemes होतील.
- समासांच्या बाबतीत तर समासातील जेवढी पदे असतील ती आणि सामासिक पदाला लागलेले प्रत्यय ही सगळी वेगवेगळी morphemes होतील, उदा॰ 'रामलक्ष्मणौ' यात राम, लक्ष्मण आणि औ अशी तीन morphemes होतील.

एकंदरीत व्यवसित आणि morpheme ह्या संकल्पनांची तुलना करताना असे म्हणणे भाग आहे की ह्या संकल्पना काही अंशी जुळणाऱ्या असल्या तरी त्या तंतोतंत सारख्या नाहीत. कारण शेवटी morpheme हे minimum semantic unit in a language असणे आवश्यक आहे.

व्यवसित हे अर्थवाहक असले पाहिजे ही अट आहे. परंतु आपण याआधी पाहिल्याप्रमाणे एका व्यवसितापासून दुसरे महत्तर व्यवसित तयार करता येईल किंवा एखाद्या मोठ्या व्यवसिताचे लहान भागही पाडता येतील. त्यामुळे ते minimal unit राहणार नाही.

अशा प्रकारे भाषाशास्त्राची प्राचीन भारतीय परंपरा आणि आधुनिक पाश्चिमात्य परंपरा ह्यांची ध्वनिविचार आणि पदविचार ह्या दोन अंगांनी तुलना करण्याचा एक मुक्त चिंतन अशा स्वरूपात मी प्रयत्न केला आहे.





अनुक्रमणिका

# अनुवाद : सर्जनशील आणि उपयोजनशील कौशल्य

आबासाहेब उत्तम सरवदे

भाषा आणि भाषाव्यवहार हा मानवी जीवनाचा कणा आहे. भाषेशिवाय मानवी जीवनातला कोणताच व्यवहार पूर्णत्वाला जात नाही. त्यामुळे भाषा ही मानवाला मिळालेली चिरंतन देणगी आहे. सर्जनशीलता आणि उपयोजनशीलता हा भाषेचा स्थायीभाव असतो. ह्या स्थायीभावातूनच 'अनुवाद' हे भाषिक नैपुण्य किंवा कौशल्य उदयाला आले. बाराव्या व तेराव्या शतकात अनेक संत कवींनी संस्कृत ग्रंथांचा उत्कृष्ट मराठी अनुवाद केला. बाराव्या शतकात बाल्यावस्थेत असलेली अनुवादाची परंपरा एकविसाव्या शतकात प्रौढावस्थेत जाऊन पोहोचली. ह्याचे कारण जागतिकीकरण. ह्या जागतिकीकरणामुळे आज संपूर्ण जग एका मुठीत आले. पण ह्या जगाचे अंतरंग समजून घ्यायला भाषेचा अडथळा ठरू लागला. हा अडथळा दूर करण्याचे महत्त्वपूर्ण काम अनुवादासारख्या भाषिक कौशल्याने केले. आज अनुवादामुळे जगभरातल्या बहुभाषिक लोकांची संस्कृती, त्यांचे आचार, विचार, जनजीवन, साहित्य, संगीत, कला, तत्त्वज्ञान, सामाजिक, धार्मिक आणि राजकीय परिस्थिती अनुभवता येते.

## अनुवाद संकल्पना व परंपरा

अनुवाद या व्यापक संज्ञेत 'भाषांतर' ही संज्ञा समाविष्ट आहे. एकोणिसाव्या शतकात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'भाषांतर' नावाचा लेख लिहिला. त्यात परभाषेतून भाषिक बदल होऊन येणाऱ्या साहित्याला 'भाषांतर' असे म्हटलेले आहे. पुढे ह्या भाषांतराचे स्वैर भाषांतर व रूपांतर असे विस्तारीकरण झाले. आज ह्या सर्व विस्तारीकरणाला 'अनुवाद' ह्या संकल्पनेत समाविष्ट केलेले आहे. त्यामुळे अनुवाद आणि भाषांतर हे दोन शब्द रूपदृष्ट्या वेगवेगळे दिसत असले तरी अर्थदृष्ट्या ते एकच आहेत. अनुवाद हा सामासिक शब्द आहे. अनु म्हणजे मागाहून आणि वाद म्हणजे बोलणे असा अनुवाद शब्दाचा मूळ अर्थ आहे. अनुवादाची व्याख्या करताना डॉ॰मधुकर मोकाशी म्हणतात, "एका भाषेतील मजकूर दुसऱ्या भाषेत नेणे; किंवा एका भाषेच्या आशयाला अन्य भाषेत आणणे म्हणजे अनुवाद". (डॉ॰ मोकाशी, २०१२,०६.) म्हणजेच एखाद्या विशिष्ट भाषेत उच्चारलेल्या किंवा लिहिलेल्या शब्दाचा किंवा शब्दसमूहाचा इतर भाषेत पुनरुच्चार किंवा पुनर्लेखन करणे म्हणजे अनुवाद होय.





अनुक्रमणिका

अनुवादाला फार मोठा इतिहास आणि दीर्घ अशी परंपरा आहे. बाराव्या शतकामध्ये मुकुंदराज आणि संत ज्ञानेश्वर ह्यांनी संस्कृतमधील गीतेचा अनुवाद मराठीत केलेला पाहायला मिळतो. ब्रिटिशांच्या आगमनामुळे शिक्षणाचा प्रचार आणि प्रसार तळागाळातील लोकांपर्यंत झाला. त्यामुळे त्याकाळातील अनेक शिक्षित तरुण लेखन करू लागले. मात्र त्यांचे लेखन हे विशेषतः इंग्रजी साहित्याच्या धर्तीवर अवलंबून होते. एकोणिसाव्या शतकात लेखन करणाऱ्यांची संख्या लक्षणीय दिसत असली तरी बहुतांश लेखन हे अनुवादित स्वरूपाचेच होते. म्हणूनच साहित्याच्या क्षेत्रात एकोणिसावे शतक हे 'भाषांतर युग' म्हणून ओळखले गेले.

**अनुवाद : एक सर्जनशील लेखन कौशल्य**

आजचा मानव हा महाजालात वावरतो आहे. त्यामुळे एका देशात निर्माण झालेले साहित्य जागतिकीकरणामुळे सर्वत्र वाचले जात आहे. केवळ मराठीतच नव्हे तर इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, रशियन, स्पॅनिश, जपानी, इटालीयन, ब्राह्मी, मणिपुरी, आसामी, बंगाली, गुजराती, तमीळ, मल्याळम, उर्दू, कन्नड आणि हिंदी अशा अनेक भाषांमध्ये वेगवेगळ्या प्रकारांतील साहित्य अनुवादित होऊ लागले आहे. अनुवादामध्ये दोन भाषांचा संबंध येत असतो. मात्र ह्या दोन भाषांमध्ये वर्ण, शब्द आणि रूप ह्या दृष्टीने कधीच साधर्म्य नसते. अनुवाद करताना वेगवेगळ्या भाषांतील शब्दांना पर्यायी शब्द दिले जातात. मात्र दिलेले पर्यायी शब्द हे पूर्णार्थाने पर्याय नसतात. तरी देखील दिलेल्या पर्यायांतून अर्थाची साधारण कल्पना येत असते. उदा० इंदिरा गोस्वामी ह्यांच्या 'मामारा धारो तारोवाल' ह्या आसामी कादंबरीचा मराठी अनुवाद 'गंजलेली तलवार' ह्या नावाने झाला. ह्या ठिकाणी 'मामारा धारा तारोवाल' ह्या आसामी शब्दाला 'गंजलेली तलवार' हा पर्यायी शब्द जरी रूप, वर्ण, ध्वनी आणि शब्दसंख्या ह्या दृष्टीने असमान असला तरी अर्थदृष्ट्या तो आसामी भाषेतील अर्थाच्या (मामारा धारा तारोवाल) जवळ जाणारा आहे. अनुवादामध्ये दिलेल्या पर्यायी शब्दांतून अर्थाची साधारण कल्पना यावी हेच मुळात अपेक्षित असते. मात्र अनुवाद करताना समर्पक पर्यायी शब्दांची निवड करणे हे काम जसे कौशल्यपूर्ण आहे, तसेच ते सर्जनशीलही आहे. त्यामुळे एखाद्या कलाकृतीचा अनुवाद होत असताना जी प्रक्रिया घडत असते, ती प्रक्रिया सर्जनशील असते. म्हणूनच अनवाद एक सर्जनशील लेखनकौशल्य आहे.

**कला, साहित्य व संस्कृतीचा शोध**

सृष्टीमध्ये मानव हा प्राणी सर्वत्र एकसारखा आढळत असला तरी तो वापरत

असलेली भाषा, जगत असलेली संस्कृती आणि त्याच्याजवळ असलेल्या कला ह्या एकसारख्या नाहीत, तर त्या प्रदेशानुरूप वेगवेगळ्या आहेत हे अगोदर लक्षात घेतले पाहिजे. विशिष्ट प्रदेशानुसार लोकांच्या वेगवेगळ्या कला, साहित्य आणि संस्कृतींचा शोध आज अनुवादासारख्या लेखनकौशल्यातून शक्य झाला आहे. अनुवादामुळे दोन प्रदेशांतील साहित्याची, संस्कृतीची आणि कलांची तुलना करता येते. तसेच तेथील विशिष्ट प्रदेशाचा इतिहास, चालीरीती, रूढी आणि परंपराही लक्षात येतात. उदा॰ गजरा राजे ह्या लेखिकेने १९१९मध्ये प्रभातकुमार मुखर्जी ह्यांच्या 'जीवनेर मूल्य' ह्या बंगाली कादंबरीचा मराठी अनुवाद 'आयुष्याचे मोल' ह्या नावाने केला. ह्या कादंबरीमध्ये तेरा वर्षांच्या इंदिराचा विवाह तिचे वडील एका वयस्कर असलेल्या महेश्वर पंताबरोबर लावून देतात. पुढे काही दिवसांतच महेश्वर पंताचे निधन होते आणि आणि इंदिराच्या वाट्याला बालवयातच वैधव्य येते. ह्यावरून हिंदू संस्कृतीतील अनिष्ट प्रथा, परंपरा किती सर्वदूर पसरलेल्या आणि पोसलेल्या आहेत याची कल्पना तर येतेच पण घातक प्रथा आणि परंपरा ह्यांमुळे एका बालिकेचे आयुष्य मातीमोल होते ही घटना मनाला चटका लावून जाते. साहित्याच्या माध्यमातून सर्वच मानवजातीला एकमेकांना समजून घेण्याची, जाणून घेण्याची प्रचंड जिज्ञासा असते. ती जिज्ञासा अनुवादित साहित्याच्या माध्यमातून पूर्ण होऊ शकते, हे इथे लक्षात येते. आज अनुवादामुळे विशिष्ट प्रदेशातील कला, साहित्य व संस्कृतीचा शोध घेणे सोपे झाले आहे.

### देश, काल व परिस्थितीचे आकलन

अनुवाद ह्या लेखनकौशल्यामुळे आज वेगवेगळ्या देश-विदेशांतील कुटुंबव्यवस्था, समाजव्यवस्था, शिक्षणव्यवस्था, धर्मव्यवस्था, अर्थव्यवस्था, राज्यव्यवस्था, मूल्यव्यवस्था, उद्योग, व्यवसाय, ज्ञान, विज्ञान आणि तंत्रज्ञान इत्यादी परिस्थितीचे आकलन होऊ लागले आहे. उदा॰ व्यंकटेश माडगूळकरांची 'बनगरवाडी' (कादंबरी), विश्राम बेडेकरांची 'रणांगण' (कादंबरी) आणि दया पवारांचे 'बलुतं' (आत्मकथन) ही पुस्तके जर्मन भाषेत अनुवादित झाली. ह्या अनुवादांमुळे भारतातील समाजव्यवस्था, शिक्षणव्यवस्था, धर्मव्यवस्था, अर्थव्यवस्था आणि कुटुंबव्यवस्था जर्मन भाषिकांना पटकन समजते.

एकोणिसाव्या शतकामध्ये विल्यम कॅरी ह्यांनी इंग्रजीतील काही गोष्टीरूप ग्रंथांचा अनुवाद मराठीत केला. 'सिंहासनबत्तिशी', 'हितोपदेश' आणि 'पंचतंत्र' ही

विल्यम कॅरी यांनी अनुवादित केलेली गोष्टीरूप पुस्तके आहेत. ह्या पुस्तकांमुळे मराठी वाचकांवर चांगले संस्कार होण्यास मदतच झाली. त्यामुळे अनुवादाचे महत्त्व आणि उपयुक्तता दिवसेंदिवस वाढतच राहील ह्यात शंका नाही.

## ज्ञानप्राप्ती, ज्ञानवृद्धी व ज्ञानप्रसार

अनुवाद ह्या लेखनकौशल्यामुळे ज्ञान प्राप्त करणे, ज्ञान साठवून ठेवणे आणि साठवलेल्या ज्ञानाचा प्रचार आणि प्रसार करणे आज अधिक सोपे झाले आहे. आज अनेक विद्याशाखांतील ज्ञान वेगवेगळ्या भाषांत अनुवादाच्या माध्यमातून संकलित केले जाते. शिवाय अनुवादामुळे सर्वच क्षेत्रातील ज्ञानभांडार खुले आणि उपलब्ध झालेले पाहायला मिळते. साने गुरुजींनी हेन्री थॉमस ह्यांच्या 'The Story Of Human Race' ह्या इंग्रजी ग्रंथाचा मराठी अनुवाद 'मानवजातीची कथा' ह्या नावाने केला. साने गुरुजींनी ह्या अनुवादित ग्रंथातून लोकांना अखिल मानवजातीचा इतिहास आणि वाटचाल स्पष्ट करून सांगितली. अलीकडील उदाहरण द्यायचे झाले तर लेखक उत्तम कांबळे यांच्या 'आई समजून घेताना' ह्या पुस्तकाचे इंग्रजी, हिंदी आणि कन्नड इ० भाषेत अनुवाद झालेले आहेत. ह्या अनुवादित पुस्तकामुळे इतर भाषिक लोकांना आई अधिक समजून घेण्याची संधी मिळाली. तर भारताचे माजी राष्ट्रपती डॉ० ए०पी०जे० (अबुल पाकीर जैनुलाब्दीन) अब्दुल कलाम ह्यांच्या 'दि विंग्ज ऑफ फायर' ह्या इंग्रजीतील आत्मचरित्राचा माधुरी शानभाग ह्यांनी 'अग्निपंख' ह्या नावाने मराठी अनुवाद केला. ह्या अनुवादामुळे मराठी भाषिकांना डॉ० कलामांचा जीवनप्रवास, त्यातील संघर्ष, त्यांची स्वप्ने, त्यांचे आदर्श, त्यांचे संशोधन क्षेत्रातील योगदान, त्यांची कष्ट करण्याची क्षमता अशा अनेकविध गोष्टी अनुभवता येतात. त्यातून अनेक तरुणांना नव्या प्रेरणा, नवी स्वप्ने, नवे आदर्श आणि नव्या दिशा मिळतात. ही ज्ञानप्राप्तीची व ज्ञानप्रसाराची संधी अनुवादामुळेच शक्य झाली. त्यामुळे अनुवादाचे महत्त्व दिवसेंदिवस उपकारक ठरत आहे, हे वरील उदाहरणावरून स्पष्ट होते.

## गूढ गुपिते व तत्त्वे यांचा शोध

अनुवाद ह्या लेखनकौशल्यामुळे मर्मदृष्टी विकसित होते. त्यातूनच बारकावे शोधण्याची वृत्ती वाढीस लागते. आज देश, विदेश आणि प्रदेशांतील वेगवेगळ्या भाषांतील साहित्याचा अनुवाद करताना अनेक गूढ गुपिते आणि तत्त्वे उजेडात येताना

दिसतात. अनुवादाच्या आधारे उजेडात आलेली तत्त्वे, गुपिते आणि रहस्ये मानवी मनाची, बुद्धीची भूक पूर्ण करीत असतात. उदा० इंग्लडची लेखिका जे०के० रोलिंग यांची 'हॅरी पॉटर' ही कादंबरी जगातील ४४ भाषांत अनुवादित झाली. मंजुषा आमडेकर ह्यांनी ह्या कादंबरीचा मराठी अनुवाद केला. ह्या कादंबरीने दैनंदिन जीवन जगताना अकल्पित घटना घडत राहणार हे गृहीत धरून जीवन जगले तर प्रत्येकाच्या जीवनात आनंदाचा संचार होईल, किंवा प्रत्येक माणसाकडे विशिष्ट क्षमता असतातच फक्त त्याचा शोध त्याने घ्यायला हवा. असा संदेश साऱ्या जगाला दिला. जीवन आनंदी बनविण्याचे हे गूढ तत्त्व अनुवादामुळेच आज आपल्या सर्वांसमोर आले. अशी अनेक गूढ तत्त्वे अनुवादाच्या माध्यमातून जगासमोर येऊ शकतात. हे नक्की.

## अनुवाद : एक उपयोजनशील कौशल्य

अनुवाद हे एक उपयोजनशील कौशल्य आहे. १९९१नंतर भारताने खुली अर्थव्यवस्था स्वीकारली. त्यामुळे जागतिकीकरण, खाजगीकरण आणि उदारीकरण ह्या नव्या संकल्पनांनी मानवाच्या दैनंदिन जीवनात प्रचंड उलथापालथी घडवल्या. नव्या धोरणामुळे देशात परदेशी गुंतवणुकी वाढल्या, बहुसंख्य आंतरराष्ट्रीय कंपन्या देशात स्थिरावल्या. त्यामुळे उद्योग, तंत्रज्ञान, विज्ञान, वैद्यक आणि प्रसारमाध्यमे इ० क्षेत्रांत अनुवादकाची (भाषांतरकाराची) गरज दिवसेंदिवस वाढू लागली. आज तर जाहिरातपत्रकापासून ते माहितीपत्रकापर्यंत आणि प्रसिद्धीपत्रकापासून ते आवेदन-निवेदनपत्रकापर्यंत अनुवादकाची गरज भासू लागली आहे. त्यामुळे अनुवादक्षेत्रात आज नोकरी व्यवसायाची प्रचंड संधी निर्माण झालेली आहे.

## अनुवाद क्षेत्रातील नोकरी व्यवसायाची संधी

अनुवादक (भाषांतरकार)

आज जागतिकीकरणामुळे मोठमोठ्या आंतरराष्ट्रीय कंपन्यांमध्ये तांत्रिक भाषांतर (टेक्निकल ट्रान्सलेशन) करण्यासाठी भाषांतरकाराची गरज असते. देशी, परदेशी भाषांवर वर्चस्व, प्रभुत्व असणाऱ्या पदवीधारक, पदविकाधारकांना ओएनजीसी, केमिकल, इलेक्ट्रिकल, विज्ञान, तंत्रज्ञान इ० क्षेत्रांतील कंपन्यांमध्ये पूर्णवेळ अनुवादक (भाषांतरकार) म्हणून नोकरी मिळू शकते. त्यामुळे वेगवेगळ्या भाषांवर प्रभुत्व असणाऱ्या व्यक्तींनी ह्या संधीचा जरूर विचार केला पाहिजे.





अनुक्रमणिका

### माहिती व मनोरंजन क्षेत्र

आज विविध भाषांत अनेकविध दैनिके, वृत्तपत्रे, मासिके आणि नियतकालिके प्रकाशित होत असतात, तर वेगवेगळ्या भाषांतील माहिती व मनोरंजनाचे कार्यक्रम इलेक्ट्रॉनिक वाहिन्यांवरून सादर केले जातात. ह्या सर्व ठिकाणी एकापेक्षा अधिक भाषांची जाण असणाऱ्यांना, एकापेक्षा अधिक भाषांवर प्रभुत्व असणाऱ्यांना व उत्कृष्ट पद्धतीने भाषा बोलणाऱ्यांना नोकरीची सुसंधी आहे. आज माहिती आणि मनोरंजनाचे क्षेत्र प्रचंड विस्तारलेले आहे. त्यामुळे आकाशवाणी, चित्रवाणी, माहिती आणि मनोरंजनाच्या खाजगी वाहिन्या, वृत्तपत्रे इ० क्षेत्रांत उत्कृष्ट वार्तांकन, संपादन आणि निवेदन करणाऱ्यांची गरज निर्माण झालेली आहे. तेव्हा ह्या क्षेत्राकडे तरुणांना नोकरी व्यवसायाच्या दृष्टिकोनातून पाहता येईल.

### पर्यटन आणि हॉटेल व्यवसाय क्षेत्र

पर्यटन आणि हॉटेल व्यवसायक्षेत्रात आज प्रचंड क्रांती झालेली आहे. वेगवेगळ्या प्रकारचे महोत्सव, क्रीडास्पर्धा आणि संमेलने वेगवेगळ्या देशांत होत असतात. हे कार्यक्रम पार पाडण्यासाठी अत्याधुनिक सोयीसुविधांनी युक्त असलेली हॉटेल्स आरक्षित केली जातात. अशा हॉटेलमध्ये परकीय देशातून येणाऱ्या मान्यवरांना, खेळाडूंना आणि कलाकारांना भाषेची अडचण येऊ नये म्हणून वेगवेगळ्या भाषा जाणणाऱ्या उत्कृष्ट भाषातज्ज्ञांची नियुक्ती केली जाते. तसेच आज अनेक अभ्यासक व पर्यटक वेगवेगळ्या देशांना भेटी देत असतात. त्यावेळी त्यांना भाषेची नक्की अडचण येते. अशा वेळी अभ्यासक व पर्यटक ह्यांना पर्यटक-मार्गदर्शकाची (टूर गाईड) मदत घ्यावी लागते. आज ह्या क्षेत्रात पर्यटक-मार्गदर्शकांची प्रचंड उणीव भासत आहे. त्यासाठी तरुणांनी जर्मन, फ्रेंच, रशियन, जपानी, स्पॅनिश, इटालियन आणि इंग्रजी ह्या भाषा शिकून घेणे जरुरीचे आहे. अनेक ठिकाणी परदेशी भाषांचे अल्प व दीर्घ मुदतीचे अभ्यासक्रम सुरू करण्यात आलेले आहेत.

### दुभाषक

आज देशविदेशांतील विविध कंपन्या, शिक्षणसंस्था, व्यापार आणि उद्योगक्षेत्रांतील विविध शिष्टमंडळे, सरकारी, निमसरकारी स्तरावरील अधिकारी आणि घटनात्मक पदावरील मान्यवर व्यक्ती वेगवेगळ्या देशांना भेटी देत असतात.





अनुक्रमणिका

अशावेळी त्यांच्या सुसंवादात अडथळा येऊ नये म्हणून दुभाषकाची नियुक्ती केली जाते. त्यामुळे आज दुभाषकांना प्रचंड प्रमाणात मागणी आहे. उत्तम दुभाषक होण्यासाठी दोन भाषांचे उत्तम ज्ञान, उत्कृष्ट भाषाकौशल्य, उत्कृष्ट शब्दसंग्रह, वेळेचे भान आणि समयसूचकता असणे गरजेचे असते.

### वाङ्मयीन क्षेत्र

साहित्याच्या क्षेत्रात आज मोठ्या प्रमाणात व्यवसायाची संधी निर्माण झाली आहे. विशिष्ट भाषेत, बोलीभाषेत बंदिस्त असलेले साहित्य अनुवादामुळे सातासमुद्रापार जाऊन पोहोचले आहे. आज विविध भाषांत अनुवादित होणाऱ्या साहित्याचे प्रमाण विपुल आहे. दिलीप चित्र्यांनी तुकोबांचे अभंग 'सेज तुका' ह्या नावाने इंग्रजीत आणले. त्यामुळे तुकोबा विश्वात्मक झाले, साऱ्या जगाला कळले. आज देश-परदेशांत वेगवेगळ्या भाषांत लेखन करणारे अनेक नामवंत लेखक आहेत. त्यांच्या अनेक कलाकृती गाजलेल्या तर काही पुरस्कारप्राप्त आहेत. अशा कलाकृती अनुवादित होण्याची गरज दिवसेंदिवस वाढू लागली आहे. गाजलेल्या कलाकृतीचा अनुवाद करण्यासाठी प्रकाशक, प्रकाशनसंस्था उत्तम अनुवादकांच्या शोधात असतात. त्यामुळे उत्तम अनुवादकाला आताही आणि भविष्यातही मागणी वाढत राहणार आहे. तेव्हा तरुणांनी ह्या क्षेत्राकडेही व्यवसायाची संधी म्हणून पाहावे.

भारत हा बहुभाषिक देश आहे. ह्या देशात अनुवादाची गरज तर सदैव जाणवते. इंग्रजीसारख्या भाषेतील ज्ञान, माहिती आपल्या भाषेत आणायची झाल्यास अनुवादासारखी कलाच उपयुक्त ठरेल.

### संदर्भ ग्रंथ

काळे कल्याण, सोमण अंजली. 'भाषांतरमीमांसा' (प्रतिमा प्रकाशन, पुणे. १९९७
मोकाशी, मधुकर. 'भाषांतर चिकित्सा' (स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. २०१२
कुलकर्णी, कृ०पां० 'मराठी भाषा : उद्गम आणि विकास.

पुस्तक परीक्षण

# अंतर - निरंतर

जया परांजपे

| | |
|---|---|
| मूळ कवितासंग्रह – निरंतर | कवयित्री – उषा मेहता (मराठी) |
| हिंदी अनुवाद – अंतर - निरंतर | अनुवादक – रेखा देशपांडे |
| प्रकाशक – परिदृश्य प्रकाशन, मुंबई | प्रथम आवृत्ती – ८ मे, २०१४ |

उषा मेहता ह्या वाचकाशी सहज संवाद साधणाऱ्या, भावना व विचारांच्या मंथनातून उठणाऱ्या जाणिवा ललित भाषेत व्यक्त करणाऱ्या कवयित्री म्हणून मराठी वाचकांस परिचित आहेत. त्यांच्या 'निरंतर' ह्या काव्य संग्रहातील कवितांचा हिंदी अनुवाद 'अंतर-निरंतर' ह्या नावाने अलीकडेच (मे २०१४) प्रसिद्ध झाला आहे. मूळ संग्रहातील काही कविता व डॉ. विजया राजाध्यक्ष ह्यांचे आरंभीचे साक्षेपी विवेचन अनुवादित पुस्तकात आलेले नाही पण हिंदीतील नावाजलेल्या लेखिका – कवयित्री पुष्पा भारती ह्यांचे कविता व अनुवादाबाबतचे भाष्य दोन्हीही संदर्भात पुरेसे बोलके आहे.

कवितांचा अनुवाद रेखा देशपांडे ह्यांनी केलेला आहे. मराठी, हिंदी व इंग्रजी भाषांवर प्रभुत्व, फिल्म पत्रकारितेतील विपुल लेखन व सरस अनुवादाचा बराच अनुभव ह्यामुळे हा अनुवाद ही सरस झाला आहे. मराठीतील संवेदनशील – चिंतनशील व स्वत:ची वेगळी काव्यशैली असणाऱ्या उषा मेहतांच्या कविता तेवढ्याच ताकदीने हिंदी वाचकांसमोर ठेवण्यात रेखा देशपांडे यशस्वी झाल्या आहेत.

कविता एकूण सात भागांत विभागण्यात आल्या आहेत. पण स्वत: कवयित्रीने म्हटल्याप्रमाणे ते काटेकोर बंदिस्त कप्पे नाहीत. कवितांमध्ये स्थूलमानाने प्रेमकविता, निसर्ग, स्त्रीजीवन व अन्य सामाजिक घटना-संदर्भ अशी प्रमुख आशयसूत्रे आलेली दिसतात.

उषा मेहतांच्या कवितेत प्रेमाच्या अनेक छटा व्यक्त झाल्या आहेत. कधी ते तरल अव्यक्त• रूपात उमटते, कधी निसर्गनियमांनुसार फुलणाऱ्या कळीप्रमाणे फुलून ती त्याच्या सहवासात हर्षोल्लासाने नाचू लागते. तो नसताना त्याची केलेली प्रतीक्षा, भेटण्याची आंतरिक ओढ – कधी ही ये, कसा ही ये, भेट ना रे! अशा आर्जवात व्यक्त होते. कवितांमध्ये शारीर अनुभवांचे निसटते संदर्भ आहेत, दोघांतील मौन व मुखर

संवाद व त्याच्या अमिट आठवणी आहेत. दुरावा, तुटलेपणा, नकोसेपणा, शंका, वांझ आठवणींचे ओझे वाहण्याचे शल्य, राग असे खूप मनोभाव आहेत व त्याच्याबरोबर 'तो' आणि 'ती'च्या एकरूपतेत दोघांच्या स्वतंत्र अस्तित्वाचे (अस्मितेचे) काय? दोघांच्या गाठी-भेटीत तिसऱ्याच्या अस्तित्वाची चाहूल तर नसेल ना? नात्यांना तुटण्याचा शापच तर नसेल ना? सहजीवनाला दुसरे पर्याय नाहीत ह्या जाणिवेसह परस्पर स्वीकाराच्या वास्तवाचे काय? अशा नवीन जाणिवांतून उठणाऱ्या वैचारिक मंथनाचा प्रौढपणाही आहे. आणि ह्या सर्वांसह 'त्याच्या'वरचा गाढ विश्वास आहे. 'अंग चोरून भिजत उभ्या असणाऱ्या तिच्यासाठी तो छत्री घेऊन वाट पाहताना दिसतो', 'ऐन घालमेलीच्या वेळी त्याची धीर देणारी 'एन्ट्री' होते' – इतकेच नाही 'आपण गेल्यावरही कधी तरी त्याला आपली आठवण येईल' असा विश्वास आहे. कारण ज्याच्यावर झोकून देऊन प्रेम केले 'तो' आत खोलवर कुठेतरी नांदत असतो. म्हणूनच कवयित्रीला 'प्रेम करायला विसरून जाण्याऱ्या' आजच्या माणसांबाबत खंत वाटते. ह्या पार्श्वभूमीवर डॉ॰ विजया राजाध्यक्ष व पुष्पा भारती ह्यांच्या विधानांची सत्यता पटते की, ''ह्या कविता वाचताना इंदिरा संतांची आठवण होते, वाटते हा त्याच्याच स्त्री-रंगाचा उत्तरार्ध आहे.'' (डॉ॰ विजया राज्याध्यक्ष) व ''उषा मेहतांची कविता महादेवी वर्मांच्या कवितेची उंची गाठू शकत नाहीत, पण 'बिटिया को उपदेश' आणि 'नजरों के घटाटोप जंगल में' अशासारख्या बऱ्याच कविता नवा आश्वासक हुंकार आणि बिंबधर्मी भाषा सौंदर्यामुळे मनात कायमच्या रेंगाळत राहतात.'' (पुष्पा भारती)

निसर्ग हा उषा मेहतांच्या कविमनाचा अविभाज्य घटक आहे. त्यांच्या बहुतांश कवितांमध्ये निसर्ग नानाविध रूपांत प्रकट झालेला दिसतो. 'महकते हरसिंगार', 'सरवा नक्काशी की शाम', 'जूही- जस्मिन के झूले पर झिलमिलाते किरन', 'पत्तों से झांकते झलमलाते रोशनी के टुकडे', 'किसलय कोमल नवेले रंगों के पाखी', चाँदनी में महकती 'रजनीगंधा', हरसिंगार के कालीन' अशी कितीतरी निसर्गचित्रे उदाहरणादाखल देता येतील की ज्यांमध्ये निसर्ग रंग, गंध, नाद व स्पर्श संवेदनांनी भारलेल्या काव्यप्रतिमांतून प्रत्ययकारी होतो. निखळ सौंदर्यचित्रणापेक्षा कवयित्रीच्या भावभावनांच्या छटा लेऊन निसर्ग त्यांच्या शब्दकळेतून उतरताना अधिक दिसतो. 'उफनता हुआ रेले-सा रोना', 'जमे हुए गहरे ताल-सा मन', 'उदास भीगी-भीगी बरसात', 'जूही के फूल सी भावना', 'सूखे ताल और टूटे - ढह चुके घाट-सा मन, 'महकती खिले फूल-सी लडकी', 'टहनी से दूर गिरते पके फलसे टूटते रिश्ते', 'ममता की घटा', 'हरियाता -मुकुलित होता मन' इ॰ अशा ठिकाणी मनोभाव व काव्यसौष्ठवाचे अद्वैत विलक्षण प्रभावी होऊन नकळत आपले वेगळेपण ही जपते.





अनुक्रमणिका

स्त्रियांच्या साहित्यात सामान्यपणे येणारे बरेचसे संदर्भ उपा मेहतांच्या कवितेतही आहेत. स्त्रीविशिष्ट अनुभव, हसत्या-खेळत्या अल्लड बालपणाचा बहर 'नोचने के लिए तैयार कौए' – अर्थात पुरुष–वासनेला बळी पडणाऱ्या स्त्रिया, प्रेमी जीवांना अत्याचार व सामाजिक बंधनाचा काच, पुरुषप्रधान समाज व कुटुंबव्यवस्थेत स्त्रीची होरपळ, अवहेलना, लाचारी व दु:ख ह्यांचे चित्रण आहे. ह्याबाबतचा कवयित्रीचा संयत आक्रोश व स्त्रिया ह्याचा हिमतीने विरोध करतील का, हा संभ्रम 'गीली लकडियाँ' कवितेत नवीन वळण घेतो. राख झटकून, फुंकर मारून अंतराग्नी (स्त्रीशक्ती) प्रज्वलित करण्याची वेळ आली आहे हा सूर स्त्रियांना अन्यायाविरुद्ध लढण्याचे बळ देणारा आहे. स्त्रीवादाचा दुराग्रह, पुरुषांविषयी टोकाचा उभा दावा व मातृत्वास नकार नसणे त्यांच्या स्त्रीकवितांचे वेगळेपण नोंदवतो. काही ठिकाणी मातृत्व हे स्त्रीच्या जगण्याचे ध्येय आहे अशी भावना व्यक्त होत असतानाच दुसरीकडे त्या मातृत्वातील क्षमाशीलता व जोडून घेण्याची शक्ती दाखवून 'स्त्रीगौरवा'ला मानवसुलभ सकारात्मक जोड देतात. वर्तमानातील आणखी एका वास्तवाला थेट भिडताना वडीलधाऱ्याच्या भूमिकेतून एकट्या राहणाऱ्या मुलीला सांगतात, एकटी आहेस म्हणून खंताऊ नकोस. 'अकेले भी कुछ फूल चुनना आना चाहिए'; 'चलते रहना है तुम्हें अब अपनी ही धुन में इतराते हुए', किंवा पशुवत अत्याचार सोसत जगण्यापेक्षा 'माणूस' म्हणून जगून पाहाना असा धीराचा संदेश देतात व स्वशक्ती व क्षमतांवर जीवनाच्या श्रेय-प्रेयाची वाट चालत राहा असे सांगतात. अशा ठिकाणी त्यांची कविता खऱ्या अर्थाने नवयुगाची स्पंदने टिपताना दिसते.

ह्याशिवाय आजच्या भोगवादी संस्कृतीचे संकट, युद्धाचे सावट, यंत्रे, संगणक व माध्यमांच्या आहारी जात असलेला माणूस कष्ट, उपासमार व फसवणुकीने पिळला गेलेला समाज असे संवेदनशील माणसाला विचार करायला लावणारे संदर्भही आहेत.

उषा मेहतांच्या बऱ्याच कवितांत औदासीन्य, एकाकीपणा, हुंदके, गुदमरलेपणा, रिक्तता असा नैराश्याचा सूर उमटत असला तरी त्याच कवितांत एकाकीपणाला 'एकांतात' बदलण्याची किमया, निसर्गनियमाने वठलेल्या झाडालाही पालवी फुटेल ही आशा व भविष्याची नांदी गाणारे हसते-खेळते मूल त्यांच्या नैराश्यावर मात करताना दिसते. ह्या सर्वांतून डोकावणारी आत्मशोधाची व चिंतनाची प्रक्रिया त्यांच्या कवितांना परिपक्वता देते. मानवी नातेसंबंध, मी कोण? माझे माझ्याशी नाते काय? विश्वाच्या पसाऱ्यात मी (माणसाचे) अस्तित्व ते काय, हा आत्मशोध व पार्थिव-अपार्थिवाच्या द्वंदापलीकडे पोहोचण्याचा ध्यास त्यांच्या काव्य सृजनप्रक्रियेचा अविभाज्य भाग बनून सर्व कवितांत व्यापून राहतो व वाचकालाही त्या प्रक्रियेत सामील करून घेतो.

ह्या कवितांच्या अनुवादाच्या संदर्भात काही निरीक्षणे पाहू. ललितकृतीचा चांगला अनुवाद मूळ कृती वाचण्याचा आनंद देतो असे मानण्यात येते. ह्या दृष्टीने काव्यानुवादाचा विचार करताना अनुवादित कविता मूळ आशय – संवेदना (रसानुभूती) ह्यांच्या किती जवळ आहे व आविष्कारामध्ये मूळ भाषेचा बाज व कार्यसौंदर्य किती व कसे जपतो हे पाहणे अगत्याचे असते.

हे सांभाळण्याची प्रक्रिया अनेक घटकांवर अवलंबून असते. त्यापैकी एक घटक काव्याचा रूपबंध किंवा काव्याची शैली हा आहे. प्रस्तुत संग्रहातील कवितांचा विचार केल्यास असे दिसते की घटना – प्रसंगांचे तपशील, लांबलचक वर्णने, निवेदने, भाष्य अशा स्वरूपाचे संदर्भ तुलनेने कमी आहेत व जेथे आहेत तेथे सर्वत्र त्यांचा अनुवाद समांतर कोटीचा आहे. एक-दोन उदाहरणांनी हे स्पष्ट होऊ शकेल –

| | |
|---|---|
| हुंदक्यांमध्ये गुदमरत | सिसकियों में घुरता हुआ |
| उसासत | उफनता हुआ |
| लोंढा फटून आल्यासारखं रडू | रेले-सा रोना |
| सहज नसतं | यूँ ही नहीं निकलता |
| काळजात कळ आल्याखेरीज | कलेजे में उठती कसक के बिना |
| एवढ्यात एक गोरा बाप घाईघाईत | तभी एक गोरा बाप तेज कदमों से |
| बरोबर त्याची गोड गोरी चिमुर्डी | साथ उसकी नन्हीमुन्नी बिटिया |
| जोडीला कुळकुळीत काळी | रानी गोरी-चिट्टी |
| दुसरी स्मार्ट चिमुर्डी | और साथ में |
| गोरा बाप खूप खेळून घेतो दोघींशी | और एक चुलबुली नन्ही-मुन्नी काली कलूटी |
| शर्यत लावतो पोहण्याची | गोरा बाप खूब खेलता है दोनों से |
| खांद्यावर घेतो दोघींना | रेस लगता है तैरने की |
| आणि एकदम ढकलून देतो पाण्यात! | कंधे पर उठा दोनों को |
| | धकेल देता है पानी में एकबारगी |

ह्या संग्रहात मुक्तक स्वरूपाच्या कविता जास्त आहेत. यामध्ये 'उत्स्फूर्त अर्थगर्भी भाषालाघव' हे शैलीचे वैशिष्ट्य दिसून येते. अशा कविता अनुवादाच्या दृष्टीने आव्हानात्मक व अनुवादकाच्या कलात्मक प्रतिभेचा कस लावणाऱ्या असतात.

अशा कवितांचा अनुवाद करत असताना रेखा देशपांडे मूळ आशय व संवेदनांशी संपूर्ण इमान राखून त्या हिंदीत उतरवण्याच्या प्रक्रियेत अनेक उपायांचा (युक्त्या) सहज-सुंदर अवलंब करतात. शब्दांचा क्रम, वाक्यांशाचा क्रम, वाक्यरचना





अनुक्रमणिका

व कवितेचा बाह्य आकृतिबंध ह्यांमध्ये त्यांनी आवश्यक ते बदल केले आहेत. जसे –

| | |
|---|---|
| तिच्यादेखील निळ्या ओस एकांतात | उसकी गीली आँखो की तनहाई में भी |
| काहीतरी गुणगुणत ... कुणीतरी ... येत आहे | कोई आ रहा है |
| | गुनगुनाता हुआ ... |
| उमलताहेत आता, उमलताहेतच शेवटी, | खिल रही है अब, हाँ आखिरकार |
| लाख-लाख चांदण्या | खिल ही रही है |
| लवचीक, पोपटी कमानींवर | चाँदनी की लाख-लाख कलियाँ |
| देवाघरचा पाऊस लेऊन अंगभर | लचीली, धानी कमानपर |
| | स्वर्ग के मह को ओढे हुए अंग-अंग पर |

अशी कितीतरी उदाहरणे देता येतील की जिथे मूळ भावना व त्यांचा प्रभाव हिंदीच्या काव्यलयीत पकडण्यात अनुवादिका यशस्वी झालेली आहे.

अनुवाद प्रक्रियेचा एक भाग म्हणून मराठीचे सुंदर हिंदीकरण (रुपांतरण) केल्याचीही अनेक स्थळे आहेत –

कोसळू पाहणारं – बरसने को उतारू

कळ्या टपोर होताहेत – कलियों पर आ रहा जोबन

जीवाला डसलेल्या जळवा आहेत (मुलीं बाबत) - जान की दुश्मन है, मुई दुश्मन!

स्वभावच तो – फितरत से मजदूर

वेढून घेतो आपल्या अस्तित्वाचं संपूर्ण भान - निगल लेता है हस्ती के समूचे एहसास को

अशा ठिकाणी शब्दानुवादात न आकळणारं नव्यानं रचण्यात आलेले आहे.

काही ठिकाणी मात्र हे साधणं कठिण झाल्याचं दिसतं. जसं -

झिम्मड धारा – धुआँधार | झिम्मड आठवणी – भीगी यादें

रानभरी झालंय मन – अनुवादात ते बेचैन होते

कशी झाली परवड अशी, जिणं झालं भिंगुळवाणं - क्यों यह हालत हुई

फुलांचा झेला – गाळला गेला | कच्च भिजणे – गाळला आहे.

ह्यातील अधोरेखित शब्द अस्सल मराठी मातीचा गंध असलेले विशिष्ट शब्द आहेत जे भावनेबरोबरच उत्स्फूर्तपणे कवितेत उतरले आहेत. त्यांच्यासाठी हिंदीत अचूक शब्द मिळणं अवघड असल्यामुळे पर्यायांचा उपयोग केला गेला आहे.

अशीच स्थिती मराठीतील सावध बरं का! भेट ना रे! मधुरिमात्र मृण नां, अरे, अगं, सखे, नकोच पण आता, चक्क नदीच नदी ह्या अधोरेखित शब्दांच्या बाबतीत ही दिसून येते. अशा ठिकाणी लक्ष्य भाषेतील पर्यायी शब्दयोजनेमुळे एकूण प्रभावात बाधा वा न्यूनता येत नाही ना? हे पाहणे महत्त्वाचे असते.

इथं हे नोंदवण्याजोगे आहे की काही ठिकाणी शब्दानुवादाच्या पलिकडे जाऊन अनुवादिकेने योजलेल्या शब्दांची ( सरगोशियॉं, जोबन, नवेली मॉं, किसलय कोमल नवेले रंगों के पाखी, सरवा नक्काशी इ. इ.) किमया अशी की 'काव्यानुवाद हा पुन: सर्जन असतो' याची साक्ष पटावी.

पण कवयित्रीच्या भाषेचं वैशिष्ट्य म्हणून आलेलं 'भाषालाघव' अनुवादामध्ये विस्ताराकडं झुकलेले दिसतं. जसं –

लोचट गर्दीत दडपून गेलेली

अंग – अंगसे सटी अनचाही भीड में बदन चुराती - सी

फुलाची फुलून येण्याची अपरिहार्यता

फुले बिना नही रहा जाता फूल से

खूप आतलं काही सांगताना

जब मन के अतल की बात कहनी होती है

शरीरभर काटा

कॉंप उठता है तन

हळूवार उघडमिट – झपका रहे है पलकों को

काही सांगताना – बात करनी होती है

थडगी उभारत जाणारी – कब्रे बनाते जा रहे है

संपूर्ण संग्रहात अशी लक्षात येतील इतकी स्थळं आहेत. बहुतांश ठिकाणी अर्थाच्या सघनतेत न्यून न आणता, प्रतिमा, प्रतीकं वा अलंकारांचे रक्षण करण्याचा प्रयत्न दिसतो. त्यामुळे ह्यांना भाषेचा पसरटपणा न म्हणता विस्तार म्हणणं योग्य ठरेल.



अनुक्रमणिका

नीला असीम आसमान
क्षितिज पर दो – चार बादलों के छपाके
पीछे उसके मोती- सी आभा

किंवा

नीली – नीली लहरें
हौले से छू जाती है किनारे से
मनाने के सूर में, भर्राये गलेसे

किंवा

नदिया भिगोती तीर दोनों
किस ओर जाने बह चली
पुलिया भी सहमी और डरी
नदिया भी भरमाई चली

किंवा

मेघ बरस रहा हौले हौले

कलियों पर आ रहा जोबन
खिलने की असहनीय लाज
और भीगी सुगंध सह न जानेवाली

अशा कवितांना कुठेही अनुवादी भाषेचा जराही गंध नाही उलट काही ठिकाणी वाचक क्षणभर थांबून विचार करतो की खरंच हा अनुवाद आहे की मूळ कविता! त्यामुळेच 'ह्या अनुवादाचं हिंदी मध्ये चांगल स्वागत होईल', ह्या पुष्पा भारती, प्रा.निशिकांत ठकार व मनोज आचार्य ह्या विद्वानांच्या विश्वासास हा अनुवाद पात्र ठरतो.

---**---

## व्हीकेराजवाडे.कॉम

**श्रद्धा काळेले**

भारत इतिहास-संशोधक मंडळाची स्थापना करणारे तसेच 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' ह्या ग्रंथमालेचे संपादन करणारे इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे इतिहास, भाषाशास्त्र, व्युत्पत्ती, व्याकरण इ० बहुविध विषयांवर व्यासंगपूर्ण संशोधन करणारे तसेच आग्रहाने मराठीतून लेखन करणारे एक अतिशय परिश्रमी, प्रतिभावंत, दृढनिश्चयी असे महाराष्ट्रीय विद्वान होते. ऐतिहासिक साधनांच्या आणि प्राचीन साहित्याच्या शोधात ते सतत हिंडत राहिले. दऱ्याखोऱ्यांतून प्राचीन अवशेष पाहत व कोनाकोपऱ्यांतून जुनी दप्तरे गोळा करत असतानाच, त्यांचे लेखनकार्यही अव्याहतपणे सुरू होते. इतिहाससंशोधक म्हणून त्यांची ख्याती झाली.

राजवाडे ह्यांनी १८९४पासून स्वतः चालू केलेले 'भाषांतर', कोल्हापूर येथील 'समर्थ', तसेच 'ग्रंथमाला', 'विश्ववृत्त', 'सरस्वती मंदिर', 'प्राचीप्रभा' इ० नियतकालिकांतून राजवाडे ह्यांनी भरपूर लेखन केले. निष्कांचन असूनही 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' ह्या शीर्षकाने अस्सल मराठी साधनांचे बावीस खंड (१८९८ – १९१७) त्यांनी संपादून प्रसिद्ध केले. त्यांनी जमवलेल्या ह्या अमूल्य साठ्यातून सुमारे एक लाख दुर्मिळ कागदपत्रांचा ठेवा http://vkrajwade.com ह्या संकेतस्थळावर इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे संशोधनमंडळ, धुळे, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई तसेच नेहरू सेंटर, मुंबई ह्यांनी उपलब्ध करून दिला आहे.

ह्या संकेतस्थळावर विविध विभाग आहेत. त्यांपैकी इतिहासाचार्य राजवाडे ह्यांच्याविषयीच्या विभागात वि०का० राजवाडे ह्यांचे संक्षिप्त चरित्र, त्यांच्या चरित्रातील घटनाक्रम, त्यांची छायाचित्रे, त्यांचे हस्ताक्षर तसेच प्रबोधनकार के०सी० ठाकरे, डॉ० श्री०व्यं० केतकर व साने गुरुजी ह्यांचे राजवाड्यांवरील लेख तसेच वि०का० राजवाडे ह्यांचे वडील बंधू वैजनाथशास्त्री राजवाडे ह्यांचे वि०का० राजवाड्यांविषयीचे पत्र ह्यांचा समावेश आहे. इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे संशोधन मंडळ ह्या संस्थेविषयीची माहिती तसेच तेथील सार्वजनिक ग्रंथालयाविषयीची माहितीही ह्या संकेतस्थळावर वाचायला मिळते.

ई-बुक्स (e-Books) ह्या विभागात विक्रीसाठी उपलब्ध असलेल्या विविध ई-पुस्तकांची माहिती देण्यात आली आहे. ह्या ई-पुस्तकांत मुं०ब० शहा संपादित समग्र राजवाडे खंड (१ ते ११), इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनी संपादलेले 'मराठ्यांच्या

इतिहासाची साधने' ह्या ग्रंथमालेचे खंड (१ ते ११), 'सोर्सेस ऑफ मराठा हिस्ट्री'चे पाच खंड, ऐतिहासिक लेख-चर्चेचे चार खंड तसेच इतर पुस्तके – उदा० भा०वा० भट ह्यांनी लिहिलेले 'इतिहासाचार्य राजवाडे ह्यांचे चरित्र', राजवाडेकृत 'धातुकोश' व 'नामादिव्युत्पत्तिकोश' ह्या महत्त्वाच्या पुस्तकांचा समावेश आहे. ई-पुस्तकांच्या किमती व नमुन्यादाखल पानेसुद्धा दिलेली आहेत. मात्र पैसे जमा करून पुस्तके उतरवून घेण्याची सोय नाही. त्यासाठी संपर्क साधता यावा म्हणून पत्ता दिला आहे.

ह्या संकेतस्थळावरील सर्वात महत्त्वाचा विभाग म्हणजे संगणकीकृत दुर्मिळ हस्तलिखिते व दस्तऐवज ह्यांचा. येथे दुर्मिळ अभिलेखांची/ हस्तलिखितांची दोन प्रकारे वर्गवारी लावून दिली आहे. संकेतस्थळाच्या डाव्या स्तंभात भाषेनुसार फारसी, संस्कृत, मराठी, हिंदी ह्या भाषांमधील व मोडी लिपीमधील दुर्मिळ अभिलेख/हस्तलिखिते विभागून दिली आहेत. सर्व कागदपत्रे विषयवार व प्रकारवार विभागली आहेत. भाषेतील विशिष्ट विषय वा प्रकार निवडला की उजवीकडच्या स्तंभात त्या विभागातील कागदपत्रांची शीर्षके अकारविल्ह्यांनुसार लावलेली दिसतात.

फारसी भाषेच्या विभागात कऱ्हाड काजी ह्यांची ६६ पत्रे व इतर फारसी-मोडी अशी द्वैलिपिक सामग्री आहे. मोडी विभागात अंकगणित, जमाखर्च, भूमिती, गद्य – मराठी – मोडी (बखर), जंत्री आणि मोडीतील काही पत्रे आहेत. संस्कृत भाषेतील भरपूर हस्तलिखिते आहेत. त्यांत वेद, वेदान्त, कोश, पुराणे आणि माहात्म्ये ह्यांबरोबरच संस्कृत व्याकरणावरील अष्टाध्यायी, लघुकौमुदी, भाष्यप्रदीपोद्योत, भट्टोजी दीक्षितकृत सिद्धान्तकौमुदी. वररुचीकृत प्राकृत मनोरमा वृत्ती इत्यादी ग्रंथांच्या हस्तलिखित प्रतींचा समावेश आहे.

मराठी विभागात आरत्या, चरित्रे, इतिहास, ज्योतिष, कथापुराणे, काव्य, स्तोत्रे, वेदान्त, याज्ञिकी ग्रंथ इत्यादींचा समावेश आहे. महिकावतीची बखर, ज्ञानेश्वरी, केकावली, ज्ञानेश्वरीचे विविध कोश, अमृतानुभव, पवनविजय, मूलस्तंभ अशा विविध महत्त्वाच्या ग्रंथांची हस्तलिखिते तसेच काही मराठी दोलामुद्रिते (१८६७पूर्वी छापलेले मराठी ग्रंथ) संगणकीय प्रतिमांच्या रूपांत इथे पाहायला मिळतात. संगणकीकरणाचे काम फारच व्यवस्थितरीत्या केलेले आढळते.

ह्या संकेतस्थळाची मांडणी नेटकी आहे. संकेतस्थळावर ठेवलेल्या सर्व सामग्रीचे दुवे मुख्य पानावर दिलेले आहेत. शुद्धलेखनाच्या काही चुका खटकतात. उदा० ऐतिहासीक, स्वामिंचे. संगणकीय प्रतिमांच्या पीडीएफ धारिकांत जी मुद्रा मजकुराच्या मध्ये दिलेली आहे ती वाचताना काही वेळा अडथळा ठरते. एकंदरीत भरपूर माहितीने परिपूर्ण असणारे हे संकेतस्थळ नक्की पाहावे, असेच आहे.

# ।। हार्दिक अभिनंदन ।।



**डॉ. अशोक केळकर भाषाअभ्यासक पुरस्कार (१ला)**
**गौरवमूर्ती – डॉ. श्रीमती मॅक्सिन बर्नसन, फलटण**

मराठी अभ्यास परिषदेच्या संस्थापक सदस्य,

## डॉ. मॅक्सिन बर्नसन

- वय ८१ वर्षे, जन्म – एस्कॅन्बा, मिशिगन, यु एस ए (अमेरिका)
- सन १९६१ मध्ये भारतात आल्या. सन १९६६ पासून फलटण येथे कार्यमग्न.
- नागरिकत्व – सन १९७८ पासून भारतीय.
- शिक्षण – प्रथम भाषा मराठी घेऊन टाटा समाजविज्ञान संस्था मुंबई येथून अध्यापन शास्त्रात एम. ए.
- पेनसील्व्हेनियात भाषाशास्त्र संबंधित विषयात पी. एच. डी. (विद्यावाचस्पती)
- त्यांच्या पी.एच.डी चा विषय – 'फलटण शहरातील मराठी बोलीमधील सामाजिक विविधता'
- ज्येष्ठ भाषा अभ्यासक, संशोधक, निबंधकार, मराठी अभ्यास परिषदेच्या संस्थापक सदस्य.
- फलटण येथील प्रगत शिक्षण संस्थेच्या संस्थापक व माजी संचालक आणि टाटा समाजविज्ञान संस्थेतील प्राध्यापक.
- अमेरिकन विद्यार्थ्यांसाठी मराठी प्रमाणपत्र अभ्यासक्रम – यासाठी पुणे विद्यापीठाची फेलोशिप प्राप्त. तसेच जगभरातील नामांकित विद्यापीठांच्या सुमारे १० अभिछात्रवृत्ती (फेलोशिप) प्राप्त.
- बेसिक मराठी इंग्लिश डिक्शनरी, मराठी रेफरन्स ग्रामर, इंटरमिडीयट मराठी रिडर, ॲडव्हान्स मराठी रिडर, मराठी डायग्नोस्टिक टेस्ट, बहुभाषिक भारत: वास्तव आणि स्वप्न अशी मराठी भाषेवरील अनेक पुस्तके प्रकाशित.
- भाषाशास्त्रावरील अनेक तांत्रिक लेख प्रसिध्द.
- भाषाविषयक अनेक आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये मोलाचा सहभाग.
- "मातृभाषेतून, त्यातही स्थानिक बोलीतून शिक्षण" या मुद्याला प्राधान्य व महत्त्व देणाऱ्या भाषातज्ज्ञ.
- प्रमाणित व अप्रमाणित भाषा म्हणजे शुद्ध व अशुद्ध भाषा नव्हे, हा महत्त्वाचा भाषाविषयक विचार रुजविला.
- परदेशातील विद्यार्थ्यांना मराठी शिकविणे व ग्रामीण महाराष्ट्रातील विद्यार्थ्यांना इंग्रजी शिकविणे याबाबतचे संशोधन आणि कार्यशाळांचे आयोजन.
- २००६ पासून प्राथमिक शिक्षण कार्यक्रमामध्ये कार्यरत.
- आजही टाटा समाजविज्ञान संस्था यांच्याअंतर्गत शिक्षण कार्यक्रमात कार्यरत.

